भारत-इतिहास-संशोधक-मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ६४

# ऐतिहासिक

# संकीर्ण साहित्य खंड ६ वा



श. १८६७ ] किंमत ९ रुपये [ इ. १९४६

# प्रस्तावना

ह्या पूर्वीचा म्ह. ऐ. सं. सा. खं. ५ हा ग्रंथ स्वीय ग्रंथ मालेंतील क्र. ६१ म्हणून श. १८६५ ( इ. १९४४ ) मध्यें प्रसिद्ध झाला. त्यापुढील हा ६ वा खंड प्रसिद्ध होत आहे. ह्या खंडांत ४१ प्रकरणांत मिळून ७३ लेखांक चौदा इतिहासाभ्यासकांनीं वाचलेले प्रसिद्ध झाले आहेत. कालदृष्ट्या पाहतां छत्र० संभाजी महाराजांपासून म्ह. इ. १६८१ पासून तो दुसऱ्या बाजीरावाची अखेर होऊन गेल्यावर म्ह. इ. १८५४ पर्यंतच्या कालांतील हे लेखांक आले असून कारकीर्दवार मोजणी केल्यास संभाजीकालीन १, राजारामकालीन ६, ताराबाईकालीन ५, थो. बाजीरावकालचे १३, बाळाजी बाजीरावाच्या राजवटींतील १९, थो. माधवरावांच्या कारकीर्दींतील ११, स० माधवरावकालीन ९, दुसऱ्या बाजीरावाच्या कालचे ५ व अव्वल इंग्रजींतील ३ लेखांक ह्या खंडांत आले आहेत. हेच विषयवारीनें लक्षांत घेतल्यास राजकीय २६, आर्थिक ७, धार्मिक १०, व्यापार २, व्यावहारिक ५, बंड १, राज्यकारभारविषयक १५, जकात व वतनविषयक १ आणि ५, टंकसाळीसंबंधीं २ अशी संख्या आढळून येईल.

पैकीं राजकिय लेखांकांपुरतें थोडक्यांत येणेंप्रमाणें--

ले. १ व २ हे सर्वस्वीं नवीन असून त्यांत पुणें येथील जुन्या आठघरे घराण्यापैकीं राजर्षी घराण्यांतील मंडळी कर्नाटकांत हरजी राजे महाडीक ह्यांजबरोबर (छत्र. संभाजीकाल) राजकीय कामगिरी करीत असल्याचें वृत्त आलें आहे. राजर्षींचा हा उल्लेख नवीन असून महाडीक यांचा जे श. त ह्याच वर्षीचा जो निर्देश आला आहे त्यांस ह्या पत्रानें निश्चिति मिळत आहे. दुसऱ्या लेखांकांत, हा कागद त्रिणामलकडील म्ह. दक्षिण कर्नाटकाकडील भागांत मराठ्यांची सत्ता चालू होती तेव्हांचा असल्यामुळें, तिकडील संज्ञा आल्या आहेत. त्या तामिल आहेत. तेन = दक्षिण, मेल = पश्चिम, किल = पूर्व, वड = उत्तर आणि मुख म्ह. प्रांतविभाग. संमत तेन मुख म्ह. (त्रिणामल परगण्यांतील) दक्षिण विभाग, हा तालुका. नंजीकाणी; काणी हें जमीन मोजण्याचें माप असून, नंजी म्ह० पाटबंधाऱ्याच्या पाण्यानें भिजणारी, सखल जमीन; वरी म्ह० जकात; चक्र हें होनाप्रमाणें चालणारें तिकडील सोन्याचें नाणें.

ले. ९ मध्यें शंकराजी नारायण सचीव यांनीं इ. स. १६९४ मध्यें पेणचें ठाणें, तेथिल मोगली अमलदार मतबारखान यानें नेमलेल्या शिवाजी तेलंगराव या ठाणेदाराचा पराभव करून घेतलें ही वार्ता आली आहे. केवळ ह्या व बाजीराव निजामभेटीचें वर्णन देणाऱ्या ले. १० ह्या पत्रांमुळेंच ह्या खंडाचा विशेष कोणास वाटला तर तेंहि इष्टच होईल इतकी ही वार्ता अभिनव आणि महत्वाची आहे. ह्या ९ व्या लेखांकाचें दुसरें महत्त्व हें आहे कीं, हें पत्र म्हणजे महजरनामा आहे. इतिहासकालीन विविध प्रकारची माहिती ह्या महजरनाम्यांतून मिळते. अर्थात् महजर म्हणजे

अगदीं सामान्य इतिहाससाधन असें जें कोणास वाटतें तें बरोबर नाहीं हेंहि येथें लक्षांत घेतलें पाहिजे. ह्या लेखांकांतील मुख्य मजकुरांत आलेल्या ग्रामनामांपैकीं आऊर व लितपेण ह्या गांवांचीं नांवें वाचनांत दुरुस्ती शक्य आहे. स. मा. रो. भा. २ पृ. २२९ वर आतुरवलित किंवा आउरवलित असें एकच तर्फाचें नांव आलें आहे. प्रस्तुत लेखांकांत तीन ठाणीं सांगावयाचीं असल्यामुळें पनवेलशिवाय आऊर व लितपेण अशीं दोन नांवें मानून तीं दिलीं आहेत. ह्या लेखांकांत आलेला विठोजी कारके हा पदातपंचसहस्त्री आहे व त्याचा ह्याच वर्षीचा असाच निर्देश शि. च. सा. ५ लें ९३६ मध्यें आलेला आहे.

पृ. १४–१७ वरील १२ वा लेखांक–११ हा आंकडा तेथें चुकून पडला आहे.— आणि पे. द. भा. ४० मधील १३२ वा लेखांक एकच आहे. पे. द. तील कागदांत ह्या खंडांतल्यापेक्षां १०–११ कलमें अधिक असलीं तरी 'पुढील चंद गहाळ' असें कलम १,२ नंतर म्हटलें आहे; व तो गहाळ भाग प्रस्तुत खंडांतील कागदांत वाचकांना आढळेल. विशेषतः हा कागद मखलाशीसह आहे. म्हणजे एखादें काम वरिष्ठां-कडे संमतीसाठीं किंवा त्यांचे त्याविषयीं काय म्हणणें आहे हें कळण्यासाठीं पाठविल्यानंतर त्याच कागदावर त्या त्या कामाच्या कलमापुढें वरिष्ठांनी जो शेरा दिला असेल त्यास मखलाशी म्हणतात. अशी मखलाशी ह्या कागदांतील कलमांत आहे व ह्याचें स्पष्ट उदाहरण 'सदरहूप्रमाणें मानूरचे कमाविसदारा (स) पत्र देणें' हें मूळ कागदांत दुसऱ्या कलमापुढें लिहिण्यास जागा नसल्यामुळें आठव्या ओळींत लिहून सांगितलें, हें आहे. ह्याप्रमाणें ह्या कागदांत असलेल्या मखलाशी, ह्या खंडांत घेतलेल्या कागदांत नक्षत्रचिन्ह घालून दाखविल्या आहेत. हा दुसरा विशेष ह्या कागदाचा अभ्यासकांना येथें दिसून येईल.

ले. १३ ह्या पत्राची तारीख १७४८ जाने. १३ ही आहे. ह्या पत्रांत नागपूरकर जानोजी भोसले ह्यानें कोनेरपंत कोल्हटकर यास, बंगालच्या अलिवर्दीखान ह्या सुभेदा-राचा भाऊ हाजी अहमद ह्याचा मुलगा म्हणजे खानाचा पुतण्या व जावई जो जैदी अहमदखान म्हणजे जैनुद्दीन अहमदखान (पाटणाचा सुभेदार) ह्याचा खून केवळ भेटीसाठीं म्हणून बोलावून पानसुपारी देताघेतांच मुरादशेरखान ह्या पठाणानें, कसा केला तें वृत्त आलें आहे. हें वृत्त व त्याची तारीख सयद गुलाम हुसेनखान कृत 'शेरे मुता-खरीन' ह्या फारशी ग्रंथावरूनच आतांपर्यंत समजून घेण्यांत येत असे. प्रस्तुत खंडांतील ह्या पत्रानें ह्या वृत्तान्ता बरोबर बंगालकडील, बीरभूम वलीनें जानोजीशीं केलेलें बोलणें फिरवल्यामुळें जानोजी त्यास लुटण्याचा बेत करतो; सरदारखान, समशेरखान ह्या पठाण मंडळीशीहि जानोजीनें करारमदार करून कांहीं पैसेहि देऊन सख्य जोडलें आणि शेवटीं हाजी अहमद व जैनुद्दीन यांच्या पदरीं चाकरी रहाण्याचा बहाणा करूनहि त्यांनीं गंगा उतरावी व तेथें जानोजीनें यावें असें पठाण व जानोजी ह्यांत बोलणें चाललें होतें. इतक्यांत (अलिवर्दीखानाचा सेनापती जो मुस्तफाखान त्याच्या मृत्युनंतर त्याच्या)

पठाणांनीं वरीलप्रमाणें जैनुद्दीनाचा खून केल्यामुळें झालेल्या गोंधळाचा फायदा घेण्यासाठीं जानोजी कोनेरपंतास रघोजीसह ससैन्य बोलावतो; इत्यादि गोष्टी नव्यानें आपणांस कळतात. ह्या संबंधांत श्री. बा. ना. सहस्रबुद्धे यांचें पुस्तक उपयुक्त आहे.

ले. १७,१८ मध्यें बलकवडे घराण्यांतील दोन तीन पुरुषांचीं नांवें आलीं आहेत. इतरत्रीहि ह्या घराण्यांतील इतर मंडळींची नांवें व कामगिरी आली आहे. पण त्यांतहि नावजी बलकवडे आणि राणोजी बलकवडे ह्या दोघांची कर्तबगारी इतिहासांत आधीं व अवश्य संग्रहीत होण्याजोगी आहे. त्यांतूनहि नावजीचें पराक्रम व नांव राजाराम कालीन इतिहासांत आतां जर नसेल तर ती एक मोठी उणीव गणली जाईल; इतकी त्याविषयींची माहिती व थोरवी ऐ. पत्रांतून आली आहे. शि. च. सा. खं. ५ ले. ९३६–९३९; प्रस्तुतचा खंड ले. १७, सनदापत्रें पृ. १८२ व १८४–८५ ले. ३१ व ३५; पे. द. भा. ३१ ले. ८१ व जेधे श. इतक्या ठिकाणीं ह्या नावजीची कामगिरी भरपूर नमूद आहे. पैकीं पे. द. भाग ३१ मधील ले. ८१ हें पत्र व 'सनदापत्रें' ह्या ग्रंथांतील पृ. १८४ वरील ३५ वा लेखांक म्हणून आलेलें पत्र हीं दोन्ही एकच होत. उलट पे. द. तील पत्रांत जो भाग सरकारी नियमान्वयें गाळला गेला; तोच भाग म्ह. इनाम जमिनीचा निर्देश, सनदापत्रें ह्या ग्रंथांत यथार्थपणें आला आहे. दुसरें असें कीं, पे. द. तील पत्रांत नावजीचें नांव दोनदां आलें असून तें जावजी असें वाचलें गेलें आहे. बा. बा. रोजनिशी भाग २ पृ. १०४ वर ह्या घराण्याचें आडनांव कवडे असें समजून त्या मागील बाल हें नांव मूळ व्यक्तीच्या बापाचें असें मानून बाल व कवडे असें तोडून दिलें गेलें आहे. वस्तुतः जावजी नव्हे नावजी हें त्याचें नांव आणि बलकवडे हेंच आडनांव आहे. असो. ज्या नावजीस लिहिलेलें पत्र ह्या खंडांत आलें आहे तो नावजी बलकवडे दुसरा तानाजी मालुसरे होय. अगदीं तानाजीप्रमाणेंच हा हशमाचा सरदार असून ह्यास पदातसप्तसहस्री अशी पदवी होती. आणि ह्याचा मुख्य पराक्रमही सिंहगडच मोगलाकडून घेणें हा आहे. ह्या नावजीनें तानाजीप्रमाणें तटास माळा लावून चढून, प्रथम स्वतः वर जाऊन, तरवारेची शर्त करून, शेवटीं तर तानाजीचा आदरपुरस्सर व मोठ्या उत्साहानें उच्चार करून सिंहगड किल्ला जिंकून घेतला. शि. च. सा. खं. ५ मधील ले. ९३६ हें पत्र ह्या संबंधीचें सर्वच वाचनीय आणि स्फूर्तिप्रद असें आहे. ह्या पत्रांत नावजीचा हा पराक्रम स्वतः शंकराजी नारायण सचीव ह्यांनींच मोठ्या कौतुकानें सांगितला आहे आणि नावजीस त्यानें सिंहगड घेतल्याबद्दल सावरगांव हा इनाम देण्याबद्दल मावळ प्रांताच्या देशाधिकाऱ्यांना आज्ञा केली आहे. ह्या पत्रांत नावजी सिंहगड घेण्यास केव्हां निघाला ती तारीख ( २५।६।१६९३ ) दिली असून कोठून निघाला ( राजमाची ) तें, तसेंच मावळ भागांतील हा किल्ला स्वाधीन ठेवण्यांतला हेतु काय ( रायगड व इतर गडकोट घेण्यास मोंगलास संधी व मार्ग मिळूं नये ) इत्यादि सर्वच तपशील दिला आहे. ह्या पत्रांत प्रारंभीं लोहगडचा निर्देश आला आहे तेथें सिंहगड पाहिजे असें वाटतें.

नावजीनें हा किल्ला श. १६१५ आषाढ शु. ८ म्ह. १६९३ जुलै १ ह्या दिवशीं घेतला आहे. नावजी म्हणतो 'पूर्वी रा. कैलासवासी ( शिवाजी महाराज ) स्वामीचे वेळेस ( हा सिंहगड ) किल्ला गनीम ( दिल्लीकर मोगलाकडे ) असता हस्तगत करावयाचा महाप्रयत्न केला; तान्हाजी मालुसरे सारिखे माणूस खर्च होऊन गेले. आपण जिवावरी निदान करून धार कबूल केली आहे; सिंहगड आश्रयाची जागा, तो हस्तगत जाहाल्यावरी मौजे सावरगाव इनाम दिल्हा पाहिजे.' ह्या नावजीच्या म्हणण्याप्रमाणें सचीव शंकराजीनें तो गांव इनाम दिला व त्यास स्वतः छत्रपती राजारामानें मान्यताहि दिली. ( ले. ५८ कित्ता. )

ह्या पुढील नावजींचें पराक्रमाचें कृत्य म्हणजे इ. १६९६ मध्यें जुन्नरकर दोगे ह्यानें कोरीगड दगा करून घेतला होता तो लढून हस्तगत करून घेणें हें आहे. ही लढाईहि मोठी नांव घेण्याजोगी झाली आहे. मोगली सैन्यांत ह्या वेळीं तोफा, स्वार असून स्वतः मनसूरखानाचा लेक पुढाकार घेऊन हल्ले चढवीत होता. पण इतक्याशीं टक्कर देऊन घोडीं पाडाव करून, माणसें ठार करून नावजीनें हा गड जिंकला. लगेच पाठोपाठ ह्याच कोरीगडच्या पेठेवर गनीम जंजिरेकर हबशी ह्यानें चाल केली व तो पेठ लुटून तेथील लोक कैद करून घेऊन चालला; तेव्हांहि ह्या नावजीनें आपल्या वीर सवंगड्यांसह व सचिवांचे मुतालीक त्रिंबक शिवदेव ह्यांसह जाऊन मारामार करून बंद सोडविले व हबश्यास पराभूत करून पिटाळून लावलें. ह्या कामगिरीबद्दल त्यास मुलखेड गांव इनाम दिला. पुढें ही देणगी लहान वाटून त्याच्या बदला दारवली हा पौड खोऱ्यांतील मोठा गांव वंशपरंपरेनें दिला आहे. ह्या लढाईतील नावजीचा प्रतिस्पर्धी जो जुन्नरकर मोगल त्याचा उल्लेख जेधे श. त. ( शि. च. प्र. ) पृ. ३० वर कोरीगडावरील चढाईस अनुलक्षून आला आहे, तेथें त्याचें वाचन दोगे असें केलें आहे. बेग असें वाचन शि. च. सा. ५ मधील पत्रांत झालें आहे. दोगे, बेग, किंवा होगे असें तिन्ही प्रकारचें वाचन ह्या मोडी अक्षरवळणामुळें संभवतें. खरा उच्चार दोगे असावा असें वाटतें. ह्या जुन्नरकर दोगे यानें ह्या स्वारींत ज्यांना पकडलें त्यांत पाचणूस गांवचे दोघे पाटील होते. ह्या पाटील मंडळीस सोडवून आणण्यासाठीं नावजीनें शिंग्यासह एक घोडी दोगे यास दिली व पाटलांची मुक्तता केली.

दोगे याची कोरीगडावरील ही स्वारी कोणच्या वर्षी झाली ह्याचें उत्तर शि. च. सा. खं. ५ ले. ९३९ वरून आणि प्रस्तुत खंडांतील ले. १७ वरून श. १६१८ म्ह. १६९६ ह्या वर्षी झाली असें सांगतां येतें. पण जेधे श. त श. १६१६ हें शक वर्ष दिलें असून ह्या शकास मुसलमानी म्ह. सुहूरसन १०९६ हा दिला आहे. व तो परस्पर जमत नाहीं. सबंध जेधे शकावलींत शकास सुहुरसन सांगितल्याचीं दोनच ठिकाणें आहेत. एक शिवाजीस राज्याभिषेक झाला त्या शक वर्षाचा सुहूरसन दिला आहे व दुसरें हें स्थल. त्यांपैकीं राज्याभिषेकशकाचा सुहूरसन बिनचूक आहे, व येथील सुहुरसन

शा. शकाशी जमत नाहीं. सुहूरसनावरून शक काढल्यास १६१७ हा शकाचा आंकडा येईल व शकावरून सुहूरसनाचा आंकडा काढल्यास १०९५ येतो.

प्रत्यंतर पुराव्यानें म्ह. शि. च. सा. ५ वरून ह्या स्वारीचें वर्ष कोणतें तें वर दिलेंच आहे. किंवा दोनदां कोरीगडावर दोगे याची चाल झाली असें मानलें तरी जे. श. तील शकसन परस्पर जमत नाहींत हें खरेंच आहे. वाटतें कीं, हा प्रसंग शकावली लेखकानें —शकावलीच्या हस्ताक्षरावरून तिचे लेखक तीन असावे.— मुसलमानी सन असलेल्या टिपणाधारें लिहिला पण शकसनाचा मेळ बसतो न बसतो हें न पाहतां अनवधानानें अलीकडील शकाच्याच खालीं हा प्रसंग उद्धृत केला गेला. असो.

नावजीच्या सिंहगड जिंकण्याच्या स्वारीचें वर्णन ले. ९३६ वरून जसें विस्तृत कळतें तसें कोरीगड प्रसंगाचें वर्णन ले ९३९ वं जेधे शकावलींतील नोंद ह्यावरून चांगलें ध्यानीं येतें. पत्रांत जुन्नरकर दोगे यानें दगा देऊन कोरीगड घेतला असें आहे व शकावलींत रायाजी बहुलकर ह्याच्या हातें भेद करून जुन्नरकर दोगे मोगलाकडील येऊन किला सिड्यामाला लावून घेतला असें आहे व तेथेंच ह्या रायाजीच्या फितुरीबद्दल पंतसचीव ह्यांनीं कोरीस जाऊन रायाजीस मार देऊन राजगडीं बालेकिल्ल्यावर अटकेंत ठेविलें असें आहे. म्हणजे पत्रांत 'दगा देऊन' एवढेंच आहे तर शकावलींत तो दगेखोर कोण व त्याच्या ह्या स्वामिद्रोही कृत्याबद्दल त्यास प्रायश्चित्त कसें व कोणीं दिलें तें सांगितलें आहे. शकावलींत 'कोरीगडावर त्रिंबकपंत मुतालीक होते' एवढेंच आहे तर पत्रांत ह्या त्रिंबकपंतांच्या बापाचें नांव देऊन हा त्र्यंबकपंत 'दिमत सुरनीस' होय अशी स्पष्टता केली आहे. ह्या स्वारींत आणखी कोणकोण होते आणि त्यांनीं लढाईंत काय कामगिरी केली तें सर्व वृत्त येथें संकलित करण्यास अवकाश नाहीं. मुख्य वृत्त आणि विवाद्य मजकुराची चर्चा येथें केली तेवढीच इष्ट आहे.

ह्यानंतर मात्र नावजीच्या हालचालींना वेगळें वळण लागलें असें दिसतें. नावजीस दिलेल्या इनामाचा भोगवटा चालू झाला नाहीं हें कारण असो, कीं अन्य कांहीं कारण असो; हेंच कारण असावें हें नावजीचा मुलगा होनाजी याचें जें पत्र आहे त्यावरून म्हणण्यास अवसर मिळतो.— त्यामुळें नावजी बंडखोर बनला आणि त्याचाच बंदोबस्त करण्याचा प्रसंग आला! पे. द. मधील किंवा सदनापत्रें ह्या ग्रंथामधील पत्र सांगतें कीं 'साल गुदस्तां (म्ह. १७००) नावजी बलकवडा याने हरामखोरीचे ढंग करून किले सुधागडाचे असिरा करून तोतयाचा बहाना केला आणि लोक जमाव करून मुलकात स्वारी घालून गांव मारून नेऊं लागला.' अर्थात् नावजीच्या ह्या दुष्कृत्यास आळा घालण्याचें काम पौडखोऱ्याचे देशमुख राघोजी राऊतराव ढमाले ह्यांनीं केलें व त्यांस त्याबद्दल वडवथर गांवची कांहीं जमीन इनाम दिली. त्या वेळीं छत्र. राजाराम मृत्यु पावला होता आणि नावजीहि ह्यापुढें लौकरच मृत्यु पावला. नावजीचें हें उपाख्यान येथें संपलें. नावजीच्या ह्या उदा-

हरणावरून काय किंवा शिवाजी महाराजांच्या पायावरी आपले लेकासह आपलें वतन वाहून खस्त होऊन जाण्याची क्रियाशपथ करणाऱ्या कान्होजी जेध्यांच्या मुलांच्या उदाहरणावरून काय, काम जाल्यावरी नसतें निमित्त ठेऊन हांकून देणाऱ्या व दोन दिवसांचे सोबती असलेल्या मुसलमानांकडे जाणारी महाराष्ट्रीयांची पराक्रमी पण पर-धार्जिणी वृत्ति व वतनलोभ हेच दुर्गुण सर्व इतिहासाभर उत्कटत्वानें दिसून येतात.

ले. १८ मध्यें राणोजी बलकवडे ह्यास राघोबादादानीं बारभाई विरूद्ध वागण्यास सक्ती केली आहे. ह्या राणोजीचे इ. १७५० पासून तों १७७७ पर्यंत उल्लेख आढळतात. हा प्रथम राजपुरी प्रांताचा अधिकारी असून मध्यंतरी नाशीक व शेवटीं उंदेरी तर्फावरील अमलदार आहे व त्या वेळचें हें ह्या खंडांतील पत्र आहे.

घाटगे, परिंचेकर जाधव ह्यासंबंधींचीं पत्रें ले. २९–३७ नवीन माहिती देत आहेत. पृ. ५० वर, सोबत जोडलेल्या एका पत्रावरून असें म्हटलें आहे तेथें ले. ४७ हें पत्र गृहीत धरावें. ले. ५० च्या पत्राबरोबर रा. खं. १ मधील ले. ६४, ६८, ७८ व ८० हीं पत्रें विचारांत घ्यावीं. तीं पत्रेंहि ह्याच वर्षांतील व ह्याच कृष्णाजी त्र्यंबकचीं असून अशींच अत्यंत महत्त्वाचीं आहेत. ले. ५१ हें पत्र इ. १७६१ मधील समजावें.

जंजिरा प्रकरणांतील जे कागद वाचले जातात ते मंडळाचा अहवाल श. १८६५ ह्यांत चिटणासांनीं सांगितल्याप्रमाणें पेशवादप्तर आणि डे. कॉ. मधील पारसनीस दप्तर ह्यांमधून मीं आणिलेल्या नकलांच्या नकला असतात. ह्यांपैकीं येथें एकदोन कागद प्रसिद्ध झाले आहेत पृ. ७२–७६.

बाणांच्या बांधणी संबंधींचा कागद ले. ५९ मध्यें छापला आहे. त्यावरून सामान्यतः प्रत्येक सरदाराच्या पदरीं हे बाण तयार करण्याचें काम चालत असावें असें म्हटलें असतां चालेल. ह्या बाणबांधणींत प्रसंगीं किती दक्षता घेतली जात असे हें इ. सं. ऐ. टिपणें भा. १ ले. २ वरून ध्यानांत घेण्याजोगें आहे. तेथें म्हटलें आहे. 'लढाईत सोडल्यावर बाणाची परीक्षा दृष्टीस पडेल. वाईट बाण निघाल्यास हातपाय तोडावे. असे बाण शर्तीचे व प्रतिज्ञेचे आहेत.'

खंडांत आलेल्या सर्वच पत्रांचा संपूर्ण परामर्श घेऊन त्या पत्रानें इतिहासांत कोणची नवीन घटना सांगितली व भर घातली वा दुरुस्ती केली हें सांगणें अवश्य असलें तरी प्रस्तुत अशक्य आहे. कांहीं पत्रांचाच थोडक्यांत विचार करणें येथें शक्य. तसा विचार झाल्यानंतर दिलेल्या विषयसूचीकडे अभ्यासक वाचकांचें लक्ष्य वेधून आणि पृ. ७७–७८ वरील भेटचिठ्या; ले. ६१–६२ घोटवडे येथील टांकसाळ; धुळपइंग्रज युद्ध ले. ६०, कर्नाटकचें ले. १९ हें वृत्तपत्र, ले. २६–२७ हीं बाजीराव थो. व शाहू यांचीं पत्रें, इत्यादि लेखांक विशेष लक्ष्य आहेत हें सांगून हा प्रस्ताव पुरा करतों.

**शंकर नारायण वत्सजोशी.**



ऐ. सं. सा. खं. ६ 4764

# विषय-सूची

---

## ऐ. संकीर्ण साहित्य खंड ६ वा

# विषयानुक्रमणिका



# ऐतिहासिक संकीर्ण साहित्य
# खंड ६ वा

## १ राजऋषि–पुणें
( श्री. कृ. वा. पुरंदरे, पुणें. )

**श्री. सर. आबासाहेब मुजूमदार** यांनीं संपादिलेल्या संग्रहांत पुढील अप्रकाशित पत्रें मिळालीं. पत्रांवरून निघणारा इतिहास तूर्त काढण्याचे भरीस न पडतां हीं अस्सल पत्रें जशींच्या तशींच पुढें ठेवितों. संकलनाची कामगिरी जादा माहिती मिळविण्यावर हातची राखून ठेवीत आहें.

ले. १ } श्री { श. १६०३ कार्तिक वा १२ / इ. १६८१ नवं. २६ शनिवार

( स्व ) स्ति श्री राज्याभिषेक शक ८ दुर्मती संवत्सरे कार्तिक बहुल द्वादसी मंदवासरे क्षत्रियकुलावतंस सिंहा ( सना ) धीश्वर श्री राजा शंभू छत्रपती स्वामी

श्री शंभु भजनोत्कंठ मो रेश्वरसुत नी लकंठ *

याणी राजश्री कृष्णाजि कासी यासि आज्ञा केली ऐसी जे विनंतिपत्र +आश्विन वद्य सप्तमीचें पाठविलें तें ×कालीच पावलें तें प्रांतीचे वर्तमान राजश्री (हर)जी राजे माहाडीक यांचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करितो म्हणून कितेक ता। लिहिलें तें तुमच्या लिहिल्याप्रमाणें कळों आलें पुढेंहि वर्तमान लिहीत जाणें आणि राजश्री हरजी राजे यांचें आज्ञेत वर्तत जाणें व तुमची वृत पुणेची आहे ते अमानत केली आहे त्यास आपले गोत्रजन हुजूर येऊन गैरवाका सांगोन वृत मोकली करवितील तरी अमानतच असों द्यावी म्हणून लिहिलें तरी तुमची वृत अमानत आहे तैसी आहे पुढे तुमचा कोणीं दाईज हुजूर आला तऱ्हीं त्याचे बोले मोकली करायाची आज्ञा होणार नाहीं अमानतच आहे येविसी तुम्ही आपलें समाधान असों देणें जाणिजे मर्या *

देवं विज
यते

रुजू[२]

१. निराळे वळणाचा. + इ. १६८१ अक्टो. २३ रविवार. × इ. १६८१ नवं. २५ + कार्तिक वा। ११ पा. स. ९।६४ * पटकोनी.

२ हा व पुढील लेखांक एकत्र लक्षांत घेतला पाहिजे. त्यावरून दोनचार गोष्टी आपल्या ध्यानीं येतील. १ पुणें देशकुळकर्णी राजर्षी घराणें, राजकारणी आश्र-

[ पुढील पानावर पाहा. ]

ले. २ } श्री {

श्रीयासह चिरंजिव राजमान्य राजश्री फतेसिंग भोसले यांसी प्रती आसिर्वाद उपरी रा। रामचंद्र कृष्ण व त्रिंबक कृष्ण उपनाम राजरुषी पुणेकर देशकुलकर्णी पा। त्रिणामल सा। मार प्रां कर्नाटक यांणी येऊन विनंति केली कीं आपले बाप रा। कृष्णाजी कासी याणी स्वामीच्या राज्यांत श्रमसाहास करून सेवा निष्टेने केली याकरितां चंजीचे मुकामी कैलासवासी राजश्री काकासाहेब यांणी कृपालू होऊन पा। मारचे नाटकणक देशकुलकर्णाचे वतन अजरामऱ्हामत करून दिल्हें पा। मार मुखे च्यार व कसबा १ येक बी तपसील

संमत तेनमुख१ संमत मेलमुख१ संमत किलमुख१ संमत वडमुख१ कसबा त्रिणामल व पुलवरी जकात१ येणेप्रो च्यार मुखे व कसबा येथील देशकुलकर्णाची वृती देऊन पत्रें करून दिल्हीं त्याप्रमाणें कितेक दिवस भोगवटा चालिला आलीकडे राजक्रांतीमुळें भोगवटा राहिला आहे याकरितां नूतन पत्रें करून देऊन उतरोतर वृत्तीचा उपभोग चाले तें केलें पाहिजे म्हणून विनंति केली व पूर्वील पत्रे आणून दाखविली त्यावरून मनास आणितां हे स्वामीचे राज्यांतील पुरातन सेवक यांचे वडिलांनीं बहूत निष्टेने सेवा केली आहे यांचे चालवणें स्वामीस आवश्यक जाणोन स्वामी यावरी कृपालू होऊन पा। मारचे नाटकणक देशकुलकर्णाची वृती करार करून दिल्ही असे या वतनास हक लाजिमा इनामत पूर्ववतप्रमाणें करार केलें असे बी तपसील

[ मागील पानावरून चालू ]
ज्यांत दक्षिण कर्नाटकांत कार्य करीत असून तिकडेहि म्ह. त्रिणामल परगण्यांत त्यानें देशकुलकर्णपणाचें वतन संपादन केलें आहे. २ तिकडे असतां आद्य छत्र० शिवाजी महाराज ह्यांचे जे तिसरे जामात हरजी राजे माहाडीक, त्यांचे हाताखालीं ह्या राजर्षी मंडळींनीं कार्य करावयाचें आहे. ३ हे राजर्षी ह्याप्रमाणें तिकडे कामावर असतां पुणें येथील त्यांचे वतनाविषयीं ते, छत्र० संभाजीस सांगतात कीं, आमची कुलकर्णपणाची वृत्ति अमानतच आहे तशी असूं यावी; आमचे घराण्यांतील कोणी येऊन कांहीं सांगून वृत्ति मोकळी करा म्हणतील, पण मोकळी करूं नये, अमानतच असों यावी. हें सांगणें छत्रपतींनीं अर्थातच मान्य केलें. वतनवृत्तिविषयींची आसक्ति किती हें येथें आणखी एकदां पाहण्यास सांपडतें. ह्या कागदावरून राजर्षि घराण्यांतील तीन पिढ्या व 'मुख' असें जोडनांव असलेले प्रांतविभाग—जे कर्नाटकांत निर्दिष्ट व रूढ आहेत, तेन-मुख, मेल-मुख किल-मुख—इत्यादि गोष्टी लक्ष्य वाटतील. दुसऱ्या लेखांकाचा काल छत्र० शाहूची कारकीर्द म्ह. पंतप्रधान बाळाजी बाजीराव ह्यांच्या राजवटींतील श. १६६८ म्ह. इ. १७४६ हा सुचवावासा वाटतो. पहिलें व दुसरें पत्र पितापुत्र संभाजी व शाहू ह्यांनीं दिलेलें आहे.—सं.

इनाम जमीन सर्वमान्य नंजिकाणी पंचवीस

| | | |
|---|---|---|
| हक गांवगना देखील जकाती पुलवरी | सां तेनमुख काणी | सां मेलमुख काणी |
| दिवाण दस्ताचे बेरजेस रयतनिसबतीने | २ वलंदे | २ पडी अग्रहार |
| दर सदे चक्र्यास चक्रे दोन | २ कुवनूर | २ समुद्र |
| २ | २ कलमलें | ४ |
| किरकोली बाजे लाजिमे नाटेवार व सेटे | १ कूलदीपमंगल | |
| माहाजन यांस जेणेप्रो चालत असेल | ७ | सां वडमुख |
| त्याप्रो यास चालवणे कलम | सां कीलमुख काणी | २ कसबा नारतांचू |
| १ | २ तुजावर | २ अरुणगिरी मंगल |
| | २ मंगल | २ सिनंदल |
| | २ सोमसवाडी | २ किमतूर |
| | ६ | ८ |

येणेंप्रो हक्क दिवाणदस्ताचे बेरजेस दर सदे चक्रे दोन व इनाम नंजी कांणी पंचवीस व लाजिमा कलम येक याप्रो करार केलें असे तरी तुम्हीं पा त्रिणामल च्यार मुखें देखील कसबा व जकाती पुलवरी येथील नाटकणक देशकुलकर्णाचे वृतीची सेवा घेऊन हक लाजिमा इनाम सदरहूप्रमाणे यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने सुरलीत चाले ते करणें या पत्राची प्रती लेहून घेऊन हे पत्र भोगावटियास याजवल परतोन देणें [1]जाणिजे बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा मर्या[2]

देयंरा

जते

बार बार बार बार बार

---

## २ राक्षसभुवनची मोहीम

(श्री. कृ. वा. पुरंदरे, पुणें)

हे सोबतचे चार लेखांक मंडळसंग्रहांतील सं. कै. **पांडोबा पटवर्धन** यांनी संपादिलेल्यापैकीं आहेत. हीं पत्रें शके १६८५ मधील निजाम—मराठ्याच्या मोहिमेची माहिती देत आहेत. यांतील ले. ३ ते ५ हीं तीन पत्रें पिलाजी जाधवरावाचा नातू सुभानजी जाधवराव यांनी चिंचवडकर देवास लिहिलीं आहेत. ले. ३ नें या मोहिमेची उभारणी करणारे सरदार कोण होते हें स्पष्ट केलें आहे व ले. ५ व ६ नें तह कोणत्या अटीवर होत होता याची स्पष्टता होते. ले. ४ हा याच मोहिमेची हालचाल देत असावा असें वाटतें.*

---

१ यापुढील मजकूर निराळे वळणाचा. २ जोडावरहि हेंच मोर्तब आहे.

* पा. स. ११।६४

ले. ३ * } श्री {शक १६८४ फाल्गुन शु. १० / इ. १७६३ फेब्रु. २३

श्रीमंत महाराज श्री स्वामीचे सेवेसी

चरणरज सुभानजी जाधवराऊ चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग दंडवत विनंति येथील क्षेम ता। फालगून शुध १० दशमी जाणून येथास्थित असे विशेष तीर्थरूपा-कडून लस्करातून काल मगलवारी साडणी स्वार पत्रें घेऊन आला तेथील वर्तमान श्रीमंत राजश्री पंतप्रधान फौजसुधा सालप्याचे घाटे उतरून कालचा मुकाम निरेच्या पाणियावर पिंपऱ्यास आले मोगल भडारकवठे यावर श्रीपढरपुरा-खालता आहे राजश्री जानोजी भोसले मोगलास जाऊन भेटले आविश्वा-[सा]ने मऱ्हाट्याच्या फौजा भोसले व सैनापती गोपालराव व गमाजीपंत वं निबालकर व खडागले वगैरे फौजा पुढे रवाना केल्या आहेत याचा त्यांचा मुकाबला पाचा साता रोजा होणार मोगलानी खासा नवाबानी फार जाहाली केली की हे दिवस नव्हेत आवंदा त्याचा आमचा सला जाला आणि वैरणकाडी या दिवसांत मिलणार नाही परतु गोपालराव व गमाजीपंता + (घाट) घालून विडाच उचलला की नवा(बास) आम्ही वैरण पुरऊ त्यावरून नवाबहि चालोन आले याचा त्याचा चिघाड जाला याच्याहि फौजा बारामतीकडे जाणार येसा प्रसंग जाला आहे मागती खूळ मातले याप्रो वर्तमान आहे सेवसी कलावे म्हणोन लिहिले आसे विशेष काये लिहिने रुपा केली पाहिजे + हे विज्ञापना

पौ फालगून शु॥ ११ गुरुवार (= इ. १७६३ फेब्रु. २४)

---

ले. ४ } श्री {श. १६८५ वैशाख वद्य ८ / इ. १७६३ मे ५

राजश्री तुलबाजी पा। ताकपीर गो। यासि

द अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य—स्नो। सुभानजी जाधवराऊ राम राम विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष आजी रविवारी सध्याकाली रात्री बातमी आली की मोगल काष्टी तादलीवरी आला पुणियास येतो याउपरी तुम्ही आपले ठाई सावधता करणे. मुले माणसे थाऱ्यास करणे अगोदर सूचना लिहिली आसे बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंति

---

* ह्या ३ ते ६ पत्रांतील उल्लेखासंबंधानें स्वतंत्रच व विस्तारानें लिहिणें इष्ट.
+ अक्षर वेगळें

१ सटवोजी ऊर्फ आपाजी जाधवराव वाघोलीकर याचा हा सुभानजी मुलगा.

ले. ५ } श्री { शक १६८५ भाद्र. वा। ४
इ. १७६३ सप्टेंबर २६

श्रीमंत महाराज श्री स्वामीचे सेवेसी

चरणरज सुभानजी जाधवराऊ चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग दंडवत विज्ञापना ता। भाद्रपद वद्य ४ चतुर्थी येथास्थित आसे विशेष लस्करची पत्रे तीर्थरूपाकडून काली त्रितीयस नजिक पिपरीचे मुकामची आली मोगल शहरात आहे सल्यावरी गोष्टी पडली आहे ब्यासी लाखाची ज्यागीर पूर्वी मोगलाने श्रीमंतास दिल्ही होती ते गतवर्षी मोगलाने घेतली होती ते द्यावी व येक दोन किल्याची अडी पडली आहे यास्तव हिमतखान मुरादखानाचे भाऊ व राजश्री गगोबा मोगलाचे लस्करात गेले आहेत येका दो रोजात ठराव करून येतील म्हणोन लि। होते किल्याचा ठराव जाला म्हणजे तेथून कुच होईल हे वर्तमान आपल्यास कलावे म्हणोन लि। असे विशेष काये लिहिणे लोभ असो दीजे हे* विज्ञापना

---

ले. ६ } श्री { शक १६८५ भाद्रपद वा। ९
इ. १७६३ आक्टोबर १

श्रीमंत माहाराज श्री स्वामीचे सेवेसी

चरणरज सुभानजी जाधवराऊ चरणावरी मस्तक ठेऊन साष्टाग दंडवत विनति येथील कुशल ता। भाद्रपद वद्य ९ नवमी पावतो येथास्थित असे विशेष स्वामींनी कृपालू होऊन पत्र पाठविले ते पावोन दर्शनातुल्य आनद जाला भादवे यात्रेचा प्रसाद पाठविला तो पावला आत्यादरे स्वीकार केला राजकी वर्तमान ल्याहावे म्हणोन आज्ञा येशास तीर्थरूपा[1]कडील पत्रे चतुर्थीची सप्तमीस आली सला जाला ज्यागिरीच्या सनदा व्हावयाच्या आहेत व येक दोन किल्याची धारूर आतूरची आडी होती यास्तव राजश्री [2]गगाधरपंत व रा। [3]कृष्णराव बलाल गेले आहेत नवाबानी करारापमाणे ब्यासी लाखाचे ज्यागिरीच्या सनदा देतात किले देत नाहीत त्याचाहि आग्रह किल्याचा फारसा नाही ज्यागीरच्या सनदा घेऊन राजश्री गंगोबा व कृष्णराव आले म्हणजे तेथून कूच होऊन फौजा देशास येतील राजश्री आबा पुरधरे याचे शरि[रा]स समाधान नाही यास्तव ते श्रीमंताजवली निरोप घेऊन सासवडास आले स्वामीचे सेवेसी विदित व्हावे म्हणोन लि। आसे विशेष काय लिहिणे कृपा केली पाहिजे हे* विनंति

---

* या पुढील मजकूर खाशाच्या हातचा आहे.

१ आपाजी जाधवरावाकडील. २ चंद्रचूड. ३ काळे.

# ३ विंचूरकर व सासवडचें दाणीपण

सासवडच्या इतिहासप्रसिद्ध घराण्यांत विंचूरकर घराण्याचा अंतर्भाव होतो. हें इतिहासज्ञास विदित आहेच. निजामशाही आदिलशाही काळांतच हें घराणें आपल्या मूळ शाखेपासून तुटून सातान्याच्या बाजूस मौ. मेढें येथें स्थाईक झालें व तेथूनच तें प्रसिद्धीस आलें. विठ्ठल शिवदेव नामवंत झाल्यानंतर त्यांनीं मूळगांव व तेथील वतन यांशीं संबंध जोडण्याची खटपट चालू केली. भोगवटा नसल्यानें अर्थात् हें प्रकरण वादाच्या भोंवऱ्यांत सापडलें हें सांगणें नकोच. शेवटीं अग्रवादी–पश्चिमवादींचीं आपापसांत तडजोड होऊन विंचूरकर सासवडकर झाले व त्यांचा तेथील वतनदारी दाणीपणा त्यास हस्तगत झाला. या वादाचा शेवट कधीं झाला हें पुढील प्रधान बाळाजी बाजीराव यांच्या पत्रावरून स्पष्ट होत आहे. सदर पत्र सासवड येथील रा. **शंकर खंडेराव पुरंदरे** यांच्या संग्रहांतील आहे.

ले. ७ } श्री नकल { श. १६७२ मार्ग. व. १० इ. १७५० डिसें. १२ बुध.

राजमान्य राजश्री नारो दादाजी गोसावी यांसी

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सुा ईहिदे खमसैन मया व आलफ कसबे सासवड येथील दाणीपणाचा वतनाचा कजिया आबाजी सिवदेव व त्रिंबक सिवदेव विठल सिवदेव व बाळाजी रंगनाथ याचा व शामजी विठल व गुरुनाथ विठल व कृष्णाजी विठल यांचा होता त्यास परस्परें आपल्यात समजोंन समजाविस पत्रे घेऊन हुजूर आले त्याजवरून मनास आणून त्याप्रोंणें सरकारची पत्रें देऊन आलाहिदा सादर केलीं आहेत तरी तुम्ही को मारच्या दाणीपणाचे वतन पूर्वीपासोन चालत आले आहे त्याप्रमाणे या उभयेताकडे चालवणे दाणीपणाचा हकदक व वाडे वगैरे कानूकायेदे पूर्वापार चालत आले आसतील त्याप्रों चालवणे जाणिजे छ २३ मोहरम*

---

# ४ तुक्या म्हंकाळाचें बंड

(श्री. कृ. वा. पुरंदरे, पुणें)

+सुप्रसिद्ध उमाजी नाईक रामोशी यानी अव्वल इंग्रजींत केलेलीं बंडें सर्वांस माहीत आहेतच. परंतु त्याचे मुलगे यांनी बापाचा मार्ग चोखाळून केलेला तोच उद्योग फारच थोड्यांना अवगत असेल. नाईक मजकुराला तुक्या व महंकाळा या नावांचे दोन मुलगे होते. हे दोघेहि पराक्रमी गडी असून त्यांनीं बापाचा सूड घेण्याकरितां

---

* पा. स. १०।६४. + पा. स. ११।६४.

शक १७६७ (इ. स. १८४६) मध्यें बंड उभारलें. या बंडाची झळ रयत व सरकार या दोघांनाही बरीच लागली. परंतु त्यांच्या हालचाली अद्याप फारशा पहाण्यांत न आल्यामुळें या बंडाचें स्वरूप नीटसें ध्यानांत येत नाहीं. पुरंदर भागांत जुन्या लोकांच्या तोंडी तुक्या–महंकाळाचें नांव येतें व ते त्यांच्या पराक्रमाचें वर्णन करीत. परंतु हल्लींच्या पिढीला यांतलें कांहींच माहीत नाहीं. असो. सोचतच्या स्मरणीय टिपणीवरून तुक्या–महंकाळाच्या एका धाडशी छाप्याची माहिती होत आहे. मौजे भिवंडी तालुका पुरंदर येथें या बंधुद्वयाचे वंशज आहेत. हा कागद कै. **पांडोबा पटवर्धन** यांच्या मंडळ–संग्रहांतील आहे.

ले. ८ श्री { श. १७६७ माघ वा। १ इ. १८४६ फेब्रु. १२

स्मरणार्थ मा।र तुक्या व म्हकाळा बि।। उमाजी रामोसी भिवडीकिर याचे बंड होऊन माग चोरून रानांत हिंडतात पोष मासी पुणे मुकामी हटसाहेब याचे बगल्यावर दरवडा सोळा सतरा आसामीनी घातला ते लोक काही सापडले त्यात पानवडीकर हणमंत रामोसी याचा लेक किंवा पुतण्या बापू रामोसी हा बंडात होता तो सदरहू चोरीत सापडला तो ठाणे सासवड येथे चौकसी करिता हुजुरून आला त्याजला कैदेत बेड्या पायात घालून कचेरीचे मंडपात होता तो माघ शु।। १५ रोजी बुधवारी दिवसा चारावर च्यार वाजता म्हणजे अस्तमानचा पाच घटका दिवस होता ते वेलेस सदरहू कैदी यास परसाकडे नेण्याकरता बरोबर तुकाराम भोंगाला व रामजी जैन सिपाई नि।। कुपणीसरकारचे हे दोन आसामी सिपाई चावलीवर सोपानदेवाकडे घेऊन गेले तेथे तुक्या व म्हंकाळा व हणमंता पानवडकिर व आणखी पाच येक आसामी असे मिलोन सिपाई याजवर चालोन येऊन भोंगला याचे हातावर तरवारीचा वार केला व जैन सिपाई याची पाघरुणे व तलवार घेऊन कैदी बेड्यासुधा उचलून घेऊन गेले मागाहून सिपाई व स्वार चालून गेले त्याची व बंडवाले याची झटपट जाली परंतु बंडवाले याणी बाप्या याचे पायांत बेडी होती ती मोडून सिपाई याजवर गोल्या घालून स्वार याचा घोडाहि आजारी केला सिपाई माघारे आले बंडवाले निघोन गेले कासिनाथ विनायक मामलेदार निवुत मु।। होते हे वर्तमान बापू आभंग याणी वाल्हे मु।। सांगितले ते लि।। असे मि।। माघ वा।। १ गुरुवार सन १२५५ शके १७६७

# ५ सचीव शंकराजी नारायण पेणचें ठाणें घेतात

(श्री. **शंकर नारायण जोशी, वत्स**)

शंकराजी नारायण ह्यांची कामगिरी राजाराम छत्रपती व त्यांच्या पत्नी ताराबाई ह्या दोघांच्या राजवटींतील आहे. 'राजाज्ञा' ह्या अधिकारावरून ते लवकरच सचीव झाले. शंकराजीस हें सचीवपद श. १६१९ म्ह. इ. १६९७ मध्यें मिळालें असें 'लेखनालंकार' पृ. ४६ वर आलें आहे. पण तेथें श. १६१२ म्ह. इ. १६९० हा काल पाहिजे. ऐ. सं. सा. खं. १ ले. ७६ वरून हें वर्ष निश्चित सांगतां येतें.

हा लेखांक ७६ अत्यंत महत्त्वाचा आहे. त्यांत 'वर घाट पटी साताऱ्यापासून जेथ-पर्यंत स्वामीच्या पुण्यप्रभावें करून देश व दुर्ग कबज होतील तेथपर्यंत राजश्री स्वामीनें आपल्या स्वाधीन राज्यभार केलाच आहे.' असें सांगून पुढें म्हटलें आहे 'सांप्रत रा. स्वामी रुपाळू होऊन आम्हास सुरनिशीचा कार्यभाग सांगितला; रायगडा-पासून कोकणपटीहि स्वाधीन केली. सनदा व वस्त्रें व अलंकारभूषणें रा। म्हालोजी कासीद राजसेवक व संताजी पडवल याचा पाठविली' आणि 'लस्कर' म्ह. 'रा. धनाजी जाधव याणी आम्हाकडे असावे' ऐसा तह केला. अगदीं ह्या उल्लेखा–नुसार जेधे श. त शंकराजींची कामगिरी नमूद आहे. म्ह. '१६१४ (इ. १६९२ नोवें. डिसें.) मध्यें धनाजी जाधव यास चंदीस राजारामाचे मदतीस रा. शंकराजीपंतीं रवाना केले' असें जें श. त आहे तें योग्यच आहे. कारण, धनाजी जाधव हा शंकराजी नारायणाकडेच दिलेला होता. असो.

ह्या शंकराजींच्या कामगिरीचे प्रसंग जेधे श० तच अधिक आले आहेत. पण ह्याहि शकावलींत नाहीं आणि अन्यत्रहि कोठें जो प्रसंग सांगितलेला नाहीं तो प्रसंग प्रस्तुतच्या कागदांत आला आहे.

हा कागद पेण प्रगण्यापैकीं साकसे ह्या गांवच्या मशिदींतील मुजावरकी संबं-धीचा आहे. ही मुजावरकी असलेल्या मुसलमान घराण्याकडे त्यासंबंधीचे कागदपत्र होते; पण आतां ते त्या घराण्यांत नाहींत, हेंच चारचौघांच्या सभेंत सांगितलें आणि तें सांगतांना ह्या कागदांत लिहिलें आहे कीं

मुजावरीसंबंधीचे कागद कां नाहींत, तर प्रगणे मजकुरचे म्हणजे पेण–चें ठाणें, जेव्हां त्यावर स्वारी होऊन लुटलें गेलें त्या लुटींत हे कागद, फर्मानें, सनदा, देखलिं वस्तभाव गेली, त्यांत गेले. ही स्वारी कोणी केली, तर ती शंकराजी नारायण यांनी फ. ११०३ च्या साबान महिन्यांतील ता. १२ रोजीं केली.

अशा प्रकारें 'शंकराजी नारायणांनीं राजमाचीहून जमाव पाठवून पेण हें ठाणें २९ मार्च १६९४ रोजीं गुरुवारीं घेतलें हें ह्या पत्रावरून नव्यानें कळून येतें. तसेंच

## ५ सचीव शंकराजी नारायण पेणचें ठाणें घेतात. 

'हली मोगलाची ठाणी कोकणप्रांती बैसली व तेंव्हां आऊजी आढळराव हा मराठी सत्तेतील ठाणेदार होता, त्याच्या जागीं शिवाजी तेलंगराव आला. हा शिवाजी तेलंगराव मतबारखानानें नेमिला होता. ह्यानें चारशेंपर्यंत पायदळ ठेवून पेणचें ठाणें सुदृढ व बंदोबस्ताचें केलें होतें, पण त्यास घालवून शंकराजी नारायणांनीं हें ठाणें स्वराज्यांत जोडलें. इत्यादि हकीकत ह्या महजरावरून कळते. तो महजर असा—

हा कागद श्री. वा. प्र. ओक, ॲडव्होकेट-ठाणें यांजकडून मिळाला.

ले. ९ } हू {श. १६१६ चैत्र वद्य १३
{इ. १६९४ एप्रील १२ गुरु.

[1]बावा शाहा बदरदीन

[2]निज्यामशाहा: अदि(ल)शहा राजश्री सिवाजी

महजरनामा व तेरीख २६ साबान सुहूर सन आर्बा तिसैन व अलफ सने ११०३ बेहुजूर हाजीर मज्यालसी मुकाम राजमाची———————————

राजश्री दामाजी नारायेण हप्त हजारी लस्कर

( लंब वर्तुळी दोन दामाजी
ओळींची आडवी मुद्रा ) नारायण

राजश्री महादाजी बावाजी सभासद

राजश्री केशो बाजी सभासद

( पांच श्री राजा
ओळींची रामपदपंक
उभट जसेवनीत
वाटोळी मर केसो
मुद्रा ) बाजी

राजश्री रंगो राम सभासद
दि सरसुभा राजश्री बहिरो
त्रिमल



श्री राजाराम
चरणी तत्पर रं
गो राम प्रभु नी
रंतर

देठखान व दाउदखान
बुबेर अधिकारी
∞ ( मुद्रा लांबट वाटोळी )

चद्राजी दिनकरराऊ अदिकारी
ता। संदीव ता। तुगरातन
( तीन वळयें असलेला उ )

कृस्णाजी महिपतराऊ
अदिकारी ता। नसरापूर पा। कोईल

'श्री कृ' ष्णाजी म
'हिपतराऊ ( तीन ओळींची वर्तुलाकार मुद्रा, आडवी उठविली आहे )

केला यैसा जे

बावा सैदान अली
बावा फते अली
( बावा ) इसुफ अली
बावा खिजमत अली
बावा इस्माइल अली
बावा अबदुल अली

मुजावर दरगाहा—[१]पीर मुकाम साकसा ता॥ पेण प्रा॥ साकसे हें [ अज ] कदीमुल अयाम पिराची खिजमत कुरसी दर कुरसी अज कारकीर्दी—[२]करीत आले आहेत व पिराचा उरुस भरतो तेथे फकीरफुकरास खर्चवेंच करावा लागतों. याबदल मौजे रोडे ता॥ मा॥ हा गाव कुल बाब कुल कानू इनाम कारकीर्द—[२]फर्मान करून दिल्हें होतें तेण्हेप्रमाणें माहाराज राजश्री—[२]कैलासवासि श्यामि येही इनामाच्या सनदा करून दिधल्या होत्या आजपावेतो भोगोटा चालिला हाली मोगलाची ठाणी कोंकणप्राती बैसली प्रगणे मजकुरी पेणेस आउजी अढलराऊ याचे ठाणे होते ते तगीर जाले सिवाजी तेलगराऊ यासि पणवेळ व आऊर व लितपेण ऐसी तीन ठाणी मतबारखान याणी सांगितली त्यास सिवाजी तेलगराऊ येही पेणेचे टाणे चारसे हसम ठेऊन मजबूद केले हे तर्फेचे कारकून—दार व लोक व वरातदार काढिले. हे वर्तमान राजश्री शंकराजी पंडित यासि विदित जाले त्याजवरून ठाणें मारावयाची आज्ञा केली आज्ञेप्रमाणे राजमाचीचे मुकामी लस्करचा व हशमाचा जमाव करून छ* १२ साबानी सन मजकुरी ठाणे मारिले ते समई गाव लुटिला तेव्हा फकीर मजकुराचेहि घर लुटिले फर्मान व सनदा देखील वस्तभाव लुटिली गेली म्हणून फकीर मजकूर राजमाचीचे मुकामी येऊन हकिकत जाहीर केली त्याजवरून सनदापत्राचा व फर्मानाचा समाचार घेतां दसजी वणजारें पदात सहश्री पंचसहश्री विठोजी कारके याचे हाती पिराचा दस्तपजा व सनदा व फर्मान लागलें तेण्हें ते कागद वाटेस कोठे टाकिले दसपजा होता तो फकिरास दिधला ऐसे वर्तमान जाले म्हणून महजर करून दिधला असे ज्या ज्या कारकीर्दीस जें जें चालिलें असेल त्याप्रमाणें चालेल श्री

मोर्तब
सूद

*( श. १६१६ चैत्र शु. १३ गुरु
इ. १६९४ मार्च २९ )

१. पिराचें नांव व तें प्रथम नुसती रेघ मजकुरांत आहे तेथें वाचावयाचें. २. ह्या तिघांच्या कारकीर्दी दुसऱ्यांदा नुसती रेघ मजकुरांत दाखविली आहे तेथें वाचावयाच्या. श्रेष्ठ व आदरणीय व्यक्तींचीं नांवें मजकुरांत नुसती रेघ दाखवून, त्या त्या रेघेच्या जागीं वाचावयासाठीं पण वर कागदाच्या प्रारंभीं लिहिण्याची रीत, त्या कालच्या पत्रलेखनांत असे. ह्यांतील कांहीं कारकीर्दी त्याच मजकुरांत संदर्भानें पुढेंहि त्या त्या मोकळ्या जागीं वाचावयाच्या आहेत. पा. स. २।६७

# ६ थोरले बाजीराव आणि निजाम भेट-वर्णन

(श्री. शं. ना. जोशी, वत्स)

पुढील पत्र स्वतः थो. बाजीराव पंतप्रधान यानें चिमाजी आपास लिहिलेलें असून त्यांत आपल्या भेटीस निजाम कसा उत्सुक होता तें व नंतर भेट झाली त्या प्रसंगाचें तपशीलवार वर्णन सांगून सावधगिरी, चंदोबस्त व देकार होऊन भेट प्रसंग कसा झाला त्याची माहिती दिली आहे.

ही बाजीराव-निजामाची रुई—रामेश्वर येथें झालेली प्रसिद्ध व महत्वाची ४ थी भेट होय. ह्या भेटीचा काल श. १६५४ पौष वद्य ७ बुधवार ता. २७-१२-१७३२ हा आहे.

बाजीराव-निजाम भेटी तीनचार झाल्या त्यांत प्रसिद्धीच्या दृष्टीनें महत्त्वाची अशी हींच भेट बऱ्याच ठिकाणीं उल्लिखित आहे. खं. ३ ले. ९७, पे. ३० ले. ३२, ९०, ९१; ५·५ ब्र. १२१ पे. २२ ले ८० इ. ह्या पत्रानेंहि ह्या समजुतीसच भर दिली असून त्या प्रत्यक्ष भेट-प्रसंगाचें वर्णन व तपशील कोठें नव्हता तो येथें मिळत आहे. पत्रहि स्वतः बाजीरावानें आणि बंधु चिमाजीस लिहिलें आहे त्याअर्थी व पत्रांत ह्यापूर्वी दोन तीन भेटी झाल्या पण ह्या भेटींत जो आपला आदर सन्मान झाला तो 'लिहिता विस्तार आहे' हें लिहिलें आहे, त्याअर्थी ही भेट तशीच महत्त्वाची व स्मरणीय झाली हें निःसंशय होय. हें पत्र देवर-अष्टे (सातारा जि.) येथील पागेवाले चिपळूणकर यांचे घराण्यांत मिळालें. पत्र असें—

---

ले. १० } श्री असल बा। नकल { श. १६५४ माघ शु. ८ / इ. १७३३ जाने १२

*श्रियासह चिरंजीव राजमान्यं राजश्री आपा यांसि बाजीराऊ बलाल आसीरवाद उपरी येथील कुशल ता। छ ६ साबान मु। मौजे सि × × पो वरवल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष आम्ही नवाबाचे भेटीकरिता त्या (निमित्या) पुण्याहून स्वार होऊन पेडगावांस आलों राजश्री भानजी निंबालकर व तुरुकताजखान याच्या भेटी जाल्या ते वर्तमान पूर्वी तुम्हास लिहिलेंच आहे त्याजवरून कललें असेल तदनंतर मजल दर मजल मौजे होकेहागे पा। लातूर प्रा। बालाघाट येथें आलों नवाब मौजे × × काटी पा। उदगीर येथे होते त्यांस आम्हास दाहा कोसाचे अंतर राहिले याजवरी दुसरे दिवसी छ १८ रजबी राजश्री आनदराव पंडित यास नवाबाकडे पाठविले यांची व नवाबाची भेट होऊन आत संतोसी जाहाले पंडित मा।रनिल्हेनी भेटीची बोलीचाली करणे ते केलीं आम्हीं कूच करून नवाबाचे लस्करापासून तीन कोसावरी अलिकडे मुकाम केला त्यास नवाब भागानगराकडे जाणार होते रोख तिकडेच होतां आम्ही सन्निध आलों भेटी लौकर व्हांवी हे नवाबासही बहुतसी उत्कंठा होती त्यास नवाबानी काटीहून कूच करून आमचे भेटीनिमित्य

---

* पा. स. ९१६५

छ १९ रजबी मुकाम केला जागा कुशाद धरून राहिले; दुसरे दिवसीं छ २० रजबी आम्ही आपले कुल फौजेनिसी निवाबाचे भेटीस गेलो नवाबाचे देवडीवर सेदोनसे चोपदार व जसाले वगैरे इतमाम असतो तो त्याणी उठवून देवडी पडित मारनिल्हे व रंभाजी निंबालकर व तुरुकताजखान यांचे हवाली केली व लोकांस ताकीद केली की हे ज्यास देवडीआत आणतील त्यास येऊ देणे म्हणोन त्याजवरी आम्ही आपली फौज कुल गोटाबाहेर ठेऊन बरोबर माणसे दोनशे घेऊन देवडीस गेलो लोक देवडीचे आत पाठविले सेवटी आपण गेलो त्यास नवाबानी सादुलाखान थोरले सादुलाखानाचे नातू व हिफजुलाखान व ऐवजखानाचे कनिष्ठपुत्र व जावई व वरकड खेस कबिलियाचे दाहावीस माणूस पुढे देवडीजवल भेटावयास पाठविले आपण खासां ऐवजखान व हमीदखान यास डेरा सोडून देवडीजवळ दहा पाच हातावर भेटावयास उभा राहातो तेथेच उभां राहिलां या सर्वांच्या भेटी जाहल्यानंतर नवाबाची आमची भेट आदरपुरसर जाहली कचेरीचे डेऱ्यांत क्षणेक बैसोन आपल्या थोरपणानरूप उतम भाषण केले तदनंतर आम्हांस हाती धरून खिलबताचे डेरियात गेले तेथे त्याजकडील रंभाजी निंबालकर व तुरकताजखान होते आम्हांकडील पांचसात माणूस मात(ब)र होते नवाबाच्या आमच्या गोष्टी इष्टक्याच्या परस्परें उतमच होणे त्या जाहाल्या नवाब फारच सतोषीं होऊन पुनरोक्त उभा राहून भेटला चिताचे खुलासियाचे भाषण राजेश्री—स्वामीचे स्तुतिस्तवन दोन घटीपर्यंत केले तदनंतर आम्हापुढे पानदान ठेऊन सर्वांस बाहेर लोकांस विडे दिल्हे आम्हाबरोबर दाहावीस पाउले येऊन निरोप दिल्हा संध्याकालचा दोन घटिका दिवस राहाता डेरियास आलों डेरियास आल्यानंतर मेवियांच्या डाल्या व मेजवानीचे सामान आपले लस्करांपासून आमचे लस्करपर्यंत येकच हारकतर दोन घटिका रात्रपर्यंत लाविली होती येक वस्त्रे व सिरपेच व जेगा कलगी दिल्ही सारांश नवाबानी भेटीचा सन्मान व आदर व लौकीक व ईजत अबरु लाये(क) बहुतच संपादिला निमित्य की या मागेही नवाबाच्या आमच्या भेटी जाहल्याच होत्या व आणखीहि अैवजखान व हमीदखान व सादुलाखान व अबदुल नबीखान यां——————
पाहिल्या होत्या त्याहीपेक्षां———————————ज व गौरव तो लौकीकफार———————————जाली नाही व पुढेहि को——————
धण्याचा तेजो प्रताप———————————————पुण्यसामुग्री
अगा———————————————लौकीक संपादणे तो संपादून येशकीर्तीचा लाभ होतो अन्यथा होणे आहेसे नाही सरलस्कर व रो। संभुसिंग याचे पुतणे धनसिंग जाधव व संताजी जाधव भोइजकर बो। राजश्री—नी दिल्हें आहेत त्याच्या भेटी जाहाल्या नव्हत्या त्या छ २४ रजबी केल्या नबा(बा)च्या व आमच्या भेटी

तीन जाहाल्या परंतु बोलीचालीचा मजकूर जाहला नाही इष्टक्याच्या व सौ व्यं (जन्या) चैच भाषण जाहालें सविस्तर तुम्हास कलावे यास्तव लिहिले आहे बोली-चाली होईल ते लिहून पाठऊ यांचा निरोप घेऊन लौकरीच माघारे जाऊ कलले पाहिजे तुम्ही आपणाकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणे नवाबाच्या आलीकडे दोनतीन भेटी दुसऱ्यां जाहाल्यां परस्परे चितांत कीत वाढला होता तो दूर होऊन दिन प्रतिदिन श्नेहाची आभिवृध्धी असे नवाबानी चौकडी मोते व दरम्यान कमची कुडक्याची जोडी दिल्ही बहुत दया व आदरसमान केला तो लिहिता विस्तार आहे सविस्तर भेटीनंतर कलेल सर्व आपले मराठे चंद्रसेन व सुलतानजीराऊ निबालकर आदिकरून सर्व आम्हास भेटविले आमचे डेरियास पाठविले आम्ही त्याचा बहुमान कर्तव्य तो केला तुम्हास कलो यास्तव लिो असे बहुत बहुत प्रकारें आदरसनमान केला तो लिहिता विस्तार आहे पुढे समयानरूप उपयोगहि होईल असे आहे लोभ असो दीजे हा आसीरवाद

---

# ७ मुधोजी भोसले ह्यांची कर्जफेड

## (श्री. शं. ना. जोशी-वत्स)

ले. १४ श्री रघुवीर (श. १६७९ चैत्र शु. ४ / इ. १७५७ मार्च २३)

नकल

*राजश्री सदासीव बलाल पोतदार गोसावी यांसी

द अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य—श्री मुधोजी (भो)सले सेनाधुरंधर दंडवत सुा सबा खमसैन मया व आलफ राजश्री नारो गोविंद जोगलेकर याचे नावें दीड लक्षाचे खत राजश्री पंत प्रधान याचे उगवणीचे लेहून दिल्हे आहे त्या यैवजी तुम्हां-पासोन घेतले मुा पुणें मिती चैत्र+ शुध्ध २ यांसी शके १६७९ ईश्वरनाम सवछरे रुा

| | |
|---|---|
| ३०००० | यैन भरणा जमा पोता |
| ४९५० | सदरहू यैवजाचे व्याज ईा मिती माार ताा मार्गसीर्ष वाा ३० शिति १ माार मुा माहे ९ येकून व्याज रुा ५४०० वजा सूट ४५० बाकी रुा दर सदे २ प्रा (इ. १७५८ जाने. ९) |
| ३४९५० | |

*ह्यासंबंधीं पुढें आणखी कांहीं पत्रें यावयाचीं आहेत. तेव्हां एकत्रच प्रस्तावनेंत त्यांचा विचार करणें इष्ट. + मार्च २१. पा. स. २०१६५

येकून चौतीस हाजार नऊशे पनास रुा भरणा करून दिल्हा आसे सदरहू रुा मुदतीस सरकारातून दिल्हे जातील मुदतीस न पावले तर पुढील मित्याचे व्याज सुधा हिसेब करू देऊ जाणिजे छ २ माहे रजब बहुत काय लिहिणें

चार

---

# ८ नवस–जीर्णोद्धार–देणग्या–यादी

ले. ११ } श्री {श. १६८२ चैत्र व. १
पा. न. पटवर्धन संग्रह नकल } {इ. १७६० एप्रील १

+यादी देवास नवस (व)गैरे कामे करावी सुरु सीतैन मया व अलफ छ १४ साबान चैत्र *चेथून सनदा याव्या

२ गोपाळराव गोविंद याणी करावी

१ नवस तुळजापुरीं नगारखाना पाठवावा त्याचे चेगमीस कांठी प्रगणियांत गाव लाऊन द्यावे व सरकारतर्फेचा नैवेद्य नंदादीप पूजा नेमून खर्च द्यावा

१ पंढरपुरीं नगारखान्याची स्थलाची सोये करून नगारखाना घालावा दरमाहा खर्च त्यांकडेच सनद असावी *चौकसी करावी

२

२ मानुरकर कमावीसदारानें करावें

१ मानूर कसबेयांत नागदेव प्राचीन गुत आहे त्याजवरी यवनाचे स्थल केले आहे ते मोडून स्थापना नीट करावी पूजा नैवेद्य नंदादीप चालवावा *ब्राह्मणास पाठवून पाहून त्याप्रमाणे करावे.

१ कसबे मजकुरी डोंगरांत केदारलिंग माहादेव आहे त्यास पूजा नैवेद्य नंदादीप चालवावा मानूर साकोश होईल *भालकीचे वर्षी स्वामींनी स्थल पाहिले आहे

२

*सदरहूप्रमाणे मानूरचे कमावीसदारा पत्र देणे-(हें आडव्या ओळींत लिहिलें आहे.

१ राक्षसभुवनकर कमावीसदार याणे करावे

१ राक्षसभुवन पिंपळगाव येथे दोन च्यार देव आहेत त्यांस पूजा नैवेद्य नंदादीप चालवावा *राक्षसभुवन राघो बावाजीकडे पिंपळगांव मात्र मंगळमूर्तीपुत्राकडे आहे.

१ राघो बावाजींनी करावे तलवडे पाा बीड येथे भवानीची दीपमाळ पाचसे रुपयेपासून हजार रुपयेपर्यंत लावून करावी दोन च्यारसे अधिक लागले तरी लावावे भवानी मुसा बुसीचे भेटीचे[१] तळावरी स्वामींनी सन समानात पाहिली आहे.

---

+ पा. स. १७६४ * इ. १७५२ १ ही भेट इ. १७५९ प्रारंभींची आहे.
* पे. द. १ पृ. २; पे. द. २५ ले. १८४; सं. २ पृ. १४७.

१ तुळजापूरचा कर व जानवा सर्वां देवाची दक्षणा घेतात ते जानवा-जवळून सोडवावी पंढरपुरासरिखे सर्वां देवापुढील दक्षणा वगैरे जमा करून जामदारखाना करावा देवास खर्च करावा कर घेऊच नये करावर खर्च असेल तो जाहागिरींत करावा तेथे मद्याचा प्रगात फार तो उत्तम नाहीं यास्तव एक कलाल ठेऊन देवीस नैवेद्य मात्र किंचित देत जावा वरकड कोण्ही पिणे अगर घेणे करू नये चोविसी देवीसहि पुसावें नैवेद्यास मात्र मद्य द्यावे देवहि नाही म्हणत नाही मद्य देखील करावे जानवा पूजा रोज नच देत तर सरकारांतून द्यावा

१ अबदलीची फते मल्हारबा अथवा भाऊसाहेब अथवा दादासाहेब यातून कोणीहिं केलिया व्यंकटेशास रुपये १०००० दाहा हजार देवावे *काम जाहालियावर द्यावे काम होईल तेव्हा करावें

१ सिंदखेडाजवळ देऊळगांव व्यंकटेशाचे गाव थोर आहे तेथे हजार दोन हजार रुपये पर्यंत देवाची पूजा वगैरे व्यवस्ता जालनापूरच्या कमावीसदारानी करवावी *यास्तव गांव घेतला जरूर करवावें चांगले स्थल आहे

१ नवे जाहागिरीत रोज वर्षासने सेते वगैरे धर्मादाव ब्राह्मणाचे असतील ते पेसींचे प्रमाणे शोध करून चालवावे म्हणऊन सर्वां कमावीसदारांस ताकीद करावी समानचे जाहगिरीत नाईकानी निमे केले आहे परंतु हालींचे जाहागिरीत भोगवटा असेल तो धर्मादाव खैरात सगळीच चालवावी थोडका अर्थ आहे

१ तालुकदारास सांगोन कर सोडवावे

१ माहूर कवडे
२ तुळजापूर व माणकेश्वर व सोनारी जानोजी निंबाळकर
१ नळदुर्ग सरकारांतून (आडव्या ओळींत 'पत्र देणें पत्र देणें' असें आहे.
१ प्रेमर विठल सुंदर
---
४

* येणेप्रमाणे कर सोडवावे माहूरची सनद आहेच वरकड आपलेच आहे विठल सुंदराने कबूल केले आहे.

१ एलगंदर सरकारांत राजेश्वर आहे हकीमजीची जाहागीर करार केली त्यांत तो गाव असलियास हकिमजीस मोबदला देऊन तो गांव घ्यावा आणि अर्धा ऐवज देवाब्राम्हणास पावेसे करावे हकीमजीच्या जाहागिरींत नसल्यास मोगलाकडे असल्यास राहिले हकीमजीकडे असेल तर सरकारांत घेतले तर हें काम हरि दामोदराकडे सांगावे मोठे स्थल आहे *मोगलाकडे असल्यास राहीले हाकीमजीकडे असल्यास जरूर करावे

१ चिरंजीव माधवरायांस त्रिंबक जेजुरी कुरकुंब मोरेश्वर थेऊरी चिंचवडी देवांकडे येणेप्रमाणे दर्शनास पाठवावें

२ केसोपंत पाटील निा कृष्णराव मामा व सरकारचा कारकून देऊन कामे करवावीं.

१ भीमा-शंकर येथें जागा नेमून केसोपंतास दाखविली तेथें हजार दीड हजार रुपयेपर्यंत लाऊन धर्मशाला बांधावी नेहमी एक दोन ब्राह्मण ठेऊन देवास पूजा नैवेद्य नंदादीप चालवावा

१ कमलजेपलीकडे तळे आहे ते दाहावीसा हजाराचे काम आहे ते करावे

२

*नारो आपाजी उधो विरेश्वर भिमाशंकरचे कामास वाकीब आहेत यांतील कोणी पाठवावा नेमून देऊन केसोपंताचे हाते तेथील सेवा घ्यावी

१ श्रीत्रिंबकेस्वरी पूजा वगैरे बंदोबस्त केल्याप्रमाणे नीट चालते करावे *हुजूरून समाचार घेत जावा नारो आपाजी अगर त्रिंबकराऊ मामास सांगून नीट चालवावे

१ त्रिंबकी मुकुंदतीर्थापासून नरसिंहतीर्थ व तळेगांवपर्यंत प्रदक्षणेच्या वाटेवर झाडे लावावी *हे काम नारो भगवंत देवळाच्या कामावर याकरवी. करवावे पंचवीस हातांवर झाडे लावावी दुतर्फा लावावी

१ नासिकिचे चक्रेस्वरचे चक्रतीर्थी पाटांगण होत आहे ते त्रिंबकरावमामा करवी सेवटास लौकर नेवावे कमरभर खडक फोडून गंगातीर्थांत खोल करावी दोन तीन हजारांचे लहान देऊळ चक्रेस्वराचे *मामाकडून सारे करवावें

१ कुश्यावर्त सिध्ध जाले पुढे चहूंकडून घरे काढून वोवऱ्या पक्या कराव्या राहूजीपंत करितील उतम नाही तर सरकारातून कराव्या लाख पाऊण लाखपर्यंत काम आहे नारो आपाजींनी अगर मामानी पाहून नीट बेत करावा कुश्यावर्त चांगले बांधले तसे वोवऱ्या विस्तीर्ण काही घरेहि जातील त्यांस ऐवज देऊन करावे लागेल एकजन्मी काम आहे बहुत करून रावजीपंत करितील नाही तर सरकारातून करावे त्यांणी केले तर बेतून ( बोलून ) सरकारातून द्यावें

*तेथील ब्राह्मण परिछिन घरे मोडू देत नाही पहि(ल्या) वोवऱ्या आहेत तितक्याच राहूजीपंतास सांगून जुन्या आहेत त्याच बांधवाव्या येणे प्रो चिरंजीव भाऊस पत्र देणे

१ मोरेस्वरी स्थलाची सोये करून नगारखाना घालावा खर्च सुभांकडून नेमून द्यावा

१ जेजुरीस देवास पांचसे रुपयांचा गांव धारवाड तालुक्यांत सन *सबांत दिला तेव्हांपासून ऐवज पावला न पावला शोध करून पाठवावा नवा गांव सन मजकुरा-

पासून गंगातीरी नारो बाबजीकडून पांचसे रुपयाचा द्यावा त्याचाही ऐवज एा दोन्ही ऐवज देवास येथास्थित पावतसे करावे *गांव नेमून देऊन पत्रे सनंदा करून द्याव्या गंगातीरी नारो बाबजीकडे गांव नेमून द्यावा ऐवज दोनीकडील नारो आपाजीनी पाहून काही नग दागिना अगर जे करणे ते समाचार घेऊन करीत जावे

१ तुळापुरी नेमिले जागा घाट बांधून त्यावर लहानसे देऊळ च्यार दिवाळी लाकडी बोवऱ्या कराव्या देवघरांत बाण आमचे लिंगाजवळ आहे तो स्थापना करावी पूजा नैवेद्य नंदादीप पंचवीस चाळीस ब्राह्मणाचे अन्नछत्र चालते करावे चाळीस पनास हजार पावेतो काम करावे *गुदस्ता काम लागले सेवट करावा

१ पुण्याहून पासाणेपर्यंत विठलवाडीपर्यंत कात्रजपर्यंत आळंदीपर्यंत थेऊरपर्यंत वाटेवर झाडे पिंपर वगैरे लावावी *पंनासा हातावर झाडे लावावी प्रेत्न थोडा उपकार फार यास्तव जरूर याप्रमाणें नारो आपाजी व जिवाजींपंताकडून करवावें

१ भिंगारचा शुक्लेस्वर याचे देऊळ बांधावे *पाव्यांत आहे दाहा वीस हजार खर्च करून चांगले करावे फार विसेष करणे नाही

१ लक्ष भोजन करविलें तें सेवटास न्यावें *बहुत करून जालें असेल शोध करावा सेवट करावा

१ श्रावणमासी ब्राह्मणास उपद्रव फार यास्तव पर्वतीस चौसोपी व मधलें दिवसी दाहा हजारपर्यंत अन्न भोजनास होई व संगमावर धर्मशाला व भोजनाचे होये व कोरेगाव घोडनदी सिरवल दोन च्यार जागा नावा नव्या चांगल्या करून घालाव्या *काम थोडे परंतु नाश मोठा होतो यास्तव जरूर करावे

१ राव आपांचे वेळेस गावोगांव दाहावीस रुपये रयात करून आंबे लावविले ते जाले पुढें अगदींच न जाले त्यास जुनर पुणें खानदेश गंगथडी बालेघाट सर्वत्र ताकीद असावी *गाव पाहून से दोनसे झाड वर्षास लावावे दाहावीस रुपये रयातहि करावी दाहावीस हजार जमा कमी होईल परंतु आंबराई फार होईल यांत लौकिक पुण्य व कोणाचाहि द्वेश नाही उत्पन्नहि होईल

२७

---

# ९ पचेट–बीरभूमकडील लढाईचें वृत्त

( श्री. शं. ना. जोशी–वत्स )

ले. १३ } श्री { श. १६७१–७७ / इ. १७४९–५५

राजश्री कोनेरपंत गोसावी यांसि

ई सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये — श्नो जानोजी भोसले दंडवत विनंती येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष विष्णुपूरचे मुक्कामीहून तीर्थरूप राजश्री बाबासाहेबांचे शेवेसी व आपणास पत्रे पाठविली त्यावरोन सविस्तर श्रुत जाहालेच असेल त्या आलीकडे विष्णुपूरचे मामलियेत कुच होन पचेटचे सरदेस आलों बिरभूम वरी याचा वकील भेटून गेला होता विष्णुपु हिन आम्ही कुच करून पचेटनजीक आलो तो बिरभूम ( चार अक्षरें लिहून चिताड करून रद्द केलीं आहेत ) वली याणे दोन अडीच हजार फौज तीन चार हजार बहेले मकसुदाबादेहून घेऊन आनिले आलिविर्दीसी करार केला की घाट बंद करितो गनीम येऊं देत नाही तो बीरभुमेस येऊन बसले त्याचे इमानत खतरा पाहून पचेटचे कामकाज करून कुच करून बिरभुमास आलो येका दो दिवसा भेटेल अगर लुटून घेऊ सरदारखान व समसेरखान व बक्षी बहेला याचे अणुसंधान अजम बुलंदखान याचे मारफतीने मेदनिपूरचे मुकामी आले होते त्यावरोन अजम मीर हबीबुलाखान व आम्ही मिलोन त्यासी करारमदार करून थोडाबहुत येवजहि बुलंदखान याचे मारफातीने दिल्हा होता त्याउपरी त्याची पत्रे आली होती की आम्ही तयार आहों परतु परिछिन तुमचे नावे गंगा उतरता येत नाही यांजकरिता पटणियामधे बाजी व जैदी आमदखान आहेत त्यासी चाकरीचा बहाणा करून गंगा उतरतो तो तुम्हीहि मजलदरमजल पटणियाकडे येणे त्याउपरी सामन्न छ १२ सफरी पत्रे त्याची आम्हास व अजम मीर यासी व बुलंदखान यासी पटणियाहून आलीं ते बजिनस नकला करून तुम्हाकडेस पाटविल्या आहेत त्यावरोन सविस्तर कलों येईल समसेरखान व बक्षी बहेला गंगा उतरोन आलिकडे आलें बाजी व जैदी आमदखान भेटीसि येऊन पटणियानजीक मुकाम करविला उभये पक्षी जाऊ येऊ लागले येक दिवसी छ २३ मोहरमी शहरात समसेरखान व बक्षी बहेला जनानासुधा जाऊन पायेउतारा होऊन किलियांत भेटीस्तव गेले कचरीस पुढे मुराद सेरखान समसेरखानाचा पुतन्या जाऊन विडे घेता जैदी आमदखानासीं व यासी बोली होऊन जैदी आमदखान मुरादसेरखान याने कटारा देऊन जिवेच मारिला बाजी धरोन कैद केला शेहर घेतले ठाणे बसविले यैसियास आपण वडिलास मानचर फोजनसी घेऊन जलदीने आले पाहिजे कार्यभाग होऊन येतो आपणास विशेष लेहावे यैसे नाही बिरभूम येथील

---

१ पा. स. १६।१७,

कामकाज विल्हे लाऊन पटनियाकडे जात असो त्या उभयेतासी भेट जालिया सविस्तर लेहून पा। बहुत काये लिहिणे हे विनंती ( अस्पष्ट मोर्तब )

पैवस्ती छ २८ जावल ऊर्फ ज्येष्ठ शुध आमावास्या युक्त प्रतिपदा

---

## १० राघोबादादांचें पलायन व आगमन

( श्री. शं. ना. जोशी, वत्स )

ले. १४ } श्री { श. १६९७–९८ इ. १७७५–७६

वडिलांचे सेवेसी विज्ञापना श्रीमंत भूपालाचे मार्गे चार कोस माघे गेले होते सरदार घेऊन बसले तेव्हा सदासीव रामचंद्र व आबाजी माहादेव सरदारांकडे येऊन श्रीमंतासी त्यासी बोलून तह करून देसास यावेसे ठराऊन माघारे आले नर्मदातीर × × आले नर्मदा उतरावयासी आठ ( च्यार दिव ) स लागतील आसे रा। हरिपंत × × आले मुधोजी भोसले काइल गडावर ( क )विले होते तेथे गेले किलेकरीयानी वर घेत नाहीत पाचा माणसानसी याल तरी ( घेऊ ) म्हणोन म्हणाले तेव्हा फिरोन गेले तेव्हां आलजपुरास आले तेथे त्याजकडील सिलेदार पठाण यासी कजिया होऊन सयाजी गुजर यांचा लेक ठार पडला मुधोजी भोसले यास तीन जखमा लागल्या येसे रा। तात्याचे लि॥ आले विदित जाले पाहिजे हे विज्ञापना*

---

## ११ मारवाडयांचा व्यापार मराठे वाणी यांजकडे

( श्री. शं. ना. जोशी, वत्स )

ले. १५ } श्री { श. १७१० कार्तिक इ. १७८८ नोवें.

+ राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री रामचंद्र नारायण स्वामी गोसावी यांसि

पो माधवराव नारायण प्रधान नमस्कार ( विनंती ) उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष गावगना कुणब्यास वगैरे लोकास मारवाडी उदमी आगाव रुपये देऊन पुढे त्याजपासून दाणा वगैरे जिनस खरेदी घेत अस(ता)त त्यास साल मजकुरी मारवाडी याणी गा(वगना) दाणा वगैरे खरेदी करू नये मराठे ( व लिंगाई )त वाणी वगैरे उदमी याणी दाणा वगैरे जिनस खरेदी करून पुण्यास आणून आमदानी करावी याप्रो सरकारातून ठरोन हे पत्र सादर केले असे तरी तुम्ही प्रा पुणे येथे गावगना कुणब्यास वगैरे लोकासताकीद करून मारवाडी यास

---

*पा. स. १८।६५ + पा. स. २०।६५

दाणा वगैरे जिनस न देणे मराठे व लिगाईत वाणी वगैरे उदमी खरेदी करितील त्यास कुणब्यानी वगैरे लोकानी दाणा वगैरे जिनस यावा त्याणी पुण्यात आणून आमदानी करावी व ज्याचा माल त्याणे पुण्यास आणून फरोख्त केल्यास सुखरूप आणून विकावा याप्रो ताकीद करणे जाणिजे × × सफर सुा तिसा समानीन मया व (अलफ) बहुत काय लिहिणे [3]हे विनती

## १२ दौलतराव शिंदे यांचें पत्र

(श्री. शं. ना. जोशी, वत्स)

ले. १६ } श्रीनाथप्रा { श. १७२४ माघ वद्य ७ / इ. १८०३ फेब्रु. १४

राजश्री रघुनाथ बाजी गोसावी यांसि

द अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य——स्नो दौलतराव सिंदे दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष सांप्रत श्रीमंताचे दौलतीत थइद्दा होऊन नवीन प्रकर्ण उपस्थित जाल्याचे तुम्हास कललेच आहे ऐसियासिं राज्याचे व श्रीमंताचे पदरचे सर्व सरदारानी येक दिल होऊन श्रीमंताचे दौलतीचे कल्याणात आपले कल्याण मोजून आपआपले सामर्थ्यानरूप फौजेचा जमाव करून सामील व्हावे हे उचित जाणोन हे +पत्र तुम्हास लिा असे तरी यासमई लिहिल्याप्रो फौजेवर चाल करून जमावनिसी शहर बऱ्हाणपुरानजीक येऊन पोहचावे आम्हीहि फौज कंपुसुधा बराणपुरानजीक येऊन दाखल जालो तुम्हीहि त्वरित यावे प्रस्तुतची हवा ऐकून कोणेविसीचा आंदेशा मनांत न आणिता फौजसुधा लांबलांब मजलीने बराणपुरानजीक येऊन पोहचणे श्रीचे कृपेकरून मनोदयानरूप बंदोबस्त होऊन येईल रा छ २१ शवाल सुा सलास मयातैन व आलफ बहुत काये लिहिणे [3]हे विनंती मोर्तब

सुद

---

+ येथें पत्राची मागील बाजू सुरू झाली व तिकडील पहिल्या दोन ओळींच्या प्रारंभास दौलतरावाची मुद्रा आहे. १–३ हीं तिन्ही अक्षरें भिन्नभिन्न. पा. स. १४।६४

१–३ तिन्ही अक्षरें पत्रलेखकाहून वेगवेगळ्या अधिकाऱ्यांचीं आहेत.

---

# १३ नाईक बलकवडे यांस पत्रें

( रा. सा. गं. के. देशपांडे–पुणें )

ले. १७ } श्री { श. १६२०
{ इ. १६९८

नकल

राजश्री नावजी नाईक बलकवडे स्वामी गोसावी यांसि

द अखंडित लक्षुमी आलंकृत राजमान्ये———शेवक चादजीराव व आनाजीराव मालंलुजकर पाटील मौजे पाचणूस तां निजामपूर जोहार सुा तिसा तिसैन अलफ आम्हा दोघास साल गुदस्ता किले सुधागडाहून जुनेरकर होगे याणी धरून जुनरास नो ठुमाजी बलकवडे याणी न्हेले होते ऐसियास तुम्ही आपली घोडी येक व तिचा सिगा येक ऐसी होंगीयास देऊन आम्हास दोघा जणास बदातून सोडऊन आनिले ऐसियास आजपासून महिन्यां भऱ्यां तुमची घोडी व घोडा ऐसे दोन्ही वस्ता देऊन जरी महिन्यां ने दू तरी आमची तकसीम पाटिलकीची दोघाचा वाटा मौजे मजीरचा आहे तो तुम्हांस दिधला असे जाणिजे बहुत काय लिा हे विनंती

याची साक्षे

| | |
|---|---|
| बहिरजी सिरके व | कुसाजी सिंदे व |
| रूपाजी पवार व | बाल्होजी सिपी व |
| नावजी पासलकर व | कृष्णाजी बलकवडे |

---

ले. १८ } श्री { श. १६९८ पौष वद्य ११
{ इ. १७७७ फेब्रु. ४

राजश्री राणोजी बलकवडे ता उंदेरी गोसावी यासी

द अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य——राजश्री रघुनाथ बाजीराव प्रधान आर्सावाद सुा सबा सबैन मया व अलफ राघोजी आंग्रे यांस बारभाईनी उंदेरीचा किला दिल्हा आहे म्हणोन हुजूर विदित जाहाले त्याजवरून हे पत्र तुम्हास सादर केले असे तरी हुजूरच्या आज्ञेसिवाय किला परिछिन आंग्रे यांच्या हवाली न करणे केल्यास पारपत्य होईल हे स्पष्ट समजोन वर्तणूक करणे जाणिजे छ २५ जिल्हेज +आज्ञाप्रमाण *( लेखनावधि ) ( मुद्रा )

श्री सांबः 'सपुत्रो विजयते' 'राजा शाहू नरपंति हर्षनिधा नै बाजीराव मुख्य प्रधान ( चार ओळींचा शिक्का. चिंत्य आहे. )

पो छ ४ मोहरम*

---

* श. १६९८ माघ शु. ६ = इ. १७७७ फेब्रु. १३

# १४ कर्नाटकांतील राजकारणी पत्रें

(श्री. मा. वि. गुजर, बी. ए.)

ले. १९ } श्री राम प्रसन्न { श. १६७५ मार्ग. व. ४
ता. १४-१२-१७५३ शुक्र

श्रीमत राजेश्री पंतप्रधान

स्वामी राजाचे सो।

विनंती सेवक आज्ञाधारक रामराये नागनाथ त्रिकाली सा। नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम ता। छ १८ सफर द्वितीया सुक्रवार परियेत त्रिवादी दरजागा नवाब मा। अलीखानाच लस्कर जाणोन माहाराजी वैभव लेखन आज्ञा केली पाहिजें *सफर छ १२ तागायेत जाहाल वर्तमान नवाब मा।रनुलेचे हरकारा घा। विनंती केली आहे त्याजवरोन चितास येईल येलीकडे वर्तमान छ १२ नारिखेस प्रहर रांत्री वकील मोहनलाल याची पत्र आली जे माहाराजास दरोबस्त बुऱ्हाणपूर शाहर सिवाये शाहरचे सुबेस दरमाहा १२ हजार रु॥ व बागलाणा आम्ही हात उचलून द्यावे आरध आवरंगोबाद अरधा बराड कसबे कसबेत ठाणी असावी येणप्रो लिहून घेतल रघोजीस ११ लाख रुाची जागीर वराडमधे द्यावी येस करार जाहला असता मल्हारजी होलकर आपणास सेनापती असता सनदा आपले नावी करून घेता माहाराजी आपले नावी करून घेतले त्यास्तव रुसवा करून बसले आहेत पुढ खर्चास नाही हैदराबाद गीरो देतो २५ लाख रुपये कर्ज देणे म्हणून पैगाम आहे यावेगळ सैद लस्करखान जानोजीची लिहिली येताती जे बागलाणा देवणे म्हणून आम्हास अर्जू करीत होते येकायेक इतुका मुलुक दिल्हा आमच काम तेथ काय आहे म्हणून पत्र लिहिताती कर्नाटकची सनदा चौथ सरदेशमुखीचे लिहिविणेस मुतसद्दी लस्करास आले आहेत कर्नाटकचा सुबादार कोणकोणाचे नावी ल्याहावे म्हणून त्याचे मुतसदीने तकरार केली त्याजवरी आम्हाकडील मुतसदीयानी नवाब मा। अलीखान सुबादार त्याचे नावी सनद लिहून देणे म्हणून बोलिले त्याजवरून सनद लिहिताती त्याची नकल पाठवितो म्हणून वकिलाने लिहिलेवरून मजला बोलाऊन हे वर्तमान विस्तार सांगोन संतोश जाहले बहुत खुसी केली श्रीमतानी सर्व प्रकार माझी दस्तगिरी करून मुदईयात स्तापना केली आम्ही भले घराण बरे हो इतर इकडील बंदबस्त माहाराजाचे खातीर खोव्हामवफीक करून इगरेजास घेऊन हजूर येऊन पावावे तेथून सलाबतजंगाचे लस्करास पाठवितील तरी पहिल फरासीस याची चोकी होती त्याजप्रा। इंगरेजाची चौकी सलाबतजंगावरी बसवून जेव्हा घेऊन येणे म्हणून निरोप करतील तेव्हा घेऊन येईन म्हणून संतोश होऊन बोलिले अवरंगाबादेस

---

* श. १६७५ मार्ग. शु. १३ = इ. १७५३ डिसें. ८

सलाबतजंगास घेऊन बसऊन माहराज आपले तालुकेस जाणार म्हणून लिा होत तेथ जो विचार केला असेल तो बराच केला असेल फरासीसचे येक फरंगी राहून पावे येस जाहलीया त्याची मुली तेथून तुटलियावर येथ कोणास उमेद होऊन पुलचेरीस जाणार नाहीत अवघे नवाब मााअलीखानास रुजू होऊन पुढ त्याच पारपत्ये करणेच येत्नांत राहतील तेथून मुली तुटलियाने येथून नवाब माा अलीखान इगरेजा घेऊन पुदुचेरीसच जाऊन लागताती दुसरे तिसरे पुदुचेरीस खुशाली खबर आली म्हणून सेभरी सवासे तोफा सोडिताती नाहक बारूख करिताती लवकिकात खुशाली नाही ते करिताती की काये लोकास भासावे येस करितों त्यास नवाब माारनुलेस मसलत दिधली जे माहराजाच बोलचाला जाहला म्हणून हजार ब्राह्मण भोजन देवणापटणी करवितो मजला निरोप देणे देवणापटणास जाऊन केलियाने पुदुचेरीचे ब्राह्मण जेऊन जातील याजमधे लवकीक व इद्दीर त्याची मरजी त्याचे म्हणविता तरी तेथील कपितानाचे नावी पत्र लिहून देणे ईश्वराचे देऊळ आहे तेथ जाऊन करीन खर्चाविशी आपदा असेल तरी मजला निरोप देणे की जाऊन शकीने का करून येतो म्हणून निरोप मागितला पत्र चालऊन निरोप देतो म्हणाले आजी माहराजाच पुने प्रताप सलाबतजंग सर्व प्रकार पादाक्रात जाहला फरासीस तेथून मुली तुटलीच वर्तमान येताच आणखी ब्राह्मणभोजन करवितो मल्हारजी होलकर बिगडून बसला म्हणून वकिलान लिहिल आहे खर असेल की काये म्हणून विचारील त्यास जवाब दिल्हा जे जैस रघुजीस ११ लाख रुाची जागीर देविली तेसच त्यास उठऊन बसविल असेल अमीली हिकमत केली आहे त्या लस्करची खबर यास तहकीक कैची मुदईपणाचीच गोस्ट नेघालिले असतील वकिलाने दिस्टीने पाहिल कानाने येकल ते लिहितो आमचे लस्करची पत्र येतिल तेव्हा येथार्थ मानावे म्हणून जवाब दिल्हा हरयेक वर्तमान माहराजाच उर्जीत जाहालेच मजला बोलाऊन सांगताती खाविंद तरी माहाराज याची खुशालीच वर्तमान यावयाची मार्ग रक्षितो म्हणून बोलिले माहराजास त्यानीहि पत्र लिा आहे त्याजवरोन चितास येईल माहाराजाचे सेवेत मजाविसी श्वस्मरण देणार कोणी नाहीत हरयेकपत्री निरोप दिलियाने त्याचा तोडजोड करीत जाईन याविशई श्वस्मरण देणेस्तव येक ग्रहस्तास नेमणूक केलिया पुदुचेरीच पारपत्ये होये जे तो पत्र अवघी मनास आणोन त्या त्या प्राो उतर येत गेलियाने सरदारास हिमत देऊन काम घेईन चाकराहून मी चाकर आहे म्हणून अजिजी करिताती पुदुचेरीच पारिपत्य होये जे तोंवर त्याचे पत्राप्राो सर्व साहित्य होत गेलियानें पुढ उपयोगास येईल रुमीखान दुभा(सा)मी त्याने नवाब फेरोजंग मेल्याची खबर नवाब सलाबतजंगास दिधली त्यास खुतीखबरखान म्हणून किताब दिल्हा मोठा मित्रभेद आमचे लस्करात आलियाने त्या मावे दोनी जोडे बेक कारकून तैनात

जाहला पाहिजे कऱ्याला फार आहे रुपयास अवकाश नव्हता येक येक लाखानसी रुपये मिळू लागले येकायेक बंदहि जाहले करिता जळून राख जाहले आहेत त्याची सावधत बरवोधी व्हावी नवाब मारनुलेचा विचार अजी तिनी वरुष चंदाचे फंदामधे जिनून उभा राहिला फरगीचे लडाईचे डावघाव तोडजोड अवघे मळून गेले आहेत फरासिस ममता दाखऊन यास तोडणेचे फिकीर करतील तरी याजकडून कोणी तेथ नाही जे त्याच पाचसे कुटुंब आहे इतकेची हत्या होतें बन-बनाला मसाला जंगी सरंजाम सलाबतजगासी मुकाबिला घेणेची जमाव तुटून जातो इंगरेज ते पुढ येकचित घेतील येकाने अर्जी तीनी वशशे जाली कोणास चैन दिल्ह नाही दोघ चक्रवर्ये जाहालियाने प्रळये करतील पुदचेरी वर्तमान येक जाहज आल त्याजमध्ये पाचसे फरगी उतरले त्या लोकास कवयेद सिकबितातो दोनी हजार श्वार जमाव केला वेलोरचा किलेदार सिपाह लोकास चाकर ठेऊन बरचेवरी पाठवीत जातो मुरराव चंदीसमीप येऊन पधरा दिवस जाहले नवाब मा॥ अलीखानाचे अमील कितेक सांपडले ते त्यास तहसील करितो त्रिर्णामल त्रिमलूर वगैर देवळाची ठणी आहेत त्यास पुदचेरीचे हजार पाचसे प्यादे याचे दोनी तीनसे स्वार दर परगणेस मोरचे लाऊन भांडवितो गावखेडेचे महसूलचा हगाम गावचे पाटील महसुलाचे माकुलीत जामदारी घेऊन माहलसुलची रखवाली करितातो त्या महसुलास येक हिसा रयेतास देऊन दोन हिसे आपण घेऊन पैके वसूल करीत फिरतो तैसेच कंची त्रिवटूर व दवसीचा परगणा गीर्द लस्करा असपास तैसेच आरकाट आसपास पुंडाई मांडिली आहे माहराजी त्यास पत्र लिा आसता पत्र बाा सेवकान पत्र लिहिल होत जे पुदचेरीचे सिलहाने कोणाच बर जाहल नाही माहराजाचे समान राहणी केलियाने पैकेस मुलुकास काही उण नाही ज्यामधे त्याच समाधान होये आपल बहुताच पोशक आहा मुतसदी मसलत देत असतील मजलाहि सुचल ते लिा आहे म्हणून लिा असता त्याचा जवाब आला तो बजिनस पाठविला आहे त्याजवरोन चितास येईल तैसेच नंदराजाकडे थइली व पत्र पाठविल असता त्या थइलीस मुतऊन करू नये ते करून गेले कारदास कैद करून तोफा खाले उडवीत होते जीव चुकाऊन पळून आला त्याने येणप्रा सांगितल त्यासच———मधे वर्तमान कळावे म्हणून पाठविल आहे समक्षे मी विनंती करिता चितास येईल नंदराज श्रीरंगी आहे कासीद सरकारचा म्हणून बोलिला असता येणप्रमाणे करणे त्याचा नाशकालच आला आहे किलेतून फिरंगी बाहेर निघाले आहेत काये होईल ते लिहिल जाईल पैकेच गरूरी फार आहे ईश्वर करील ते सर ४॥५ दिवसात पुदचेरीची फौज च्यारी साडेच्यारी हजार श्वार नवे फरंगी पाचसे मुराराव तिन हजार स्वार दोनी हजार पेढरा येस जमाव करून लस्करावरी येऊन पडणार आहेत येसी तजवीज तेथ जाहली आहे चंदावरची फौज अद्यापि आली नाही येताच याजपासीहि पाच हजार श्वार सातसे

फरगी दोनी हजार स्वार आता मोजबत आहे परतु घोडेमधे काही बळ राहिला नाही चंदावरची फौज आलियाने जमाव घेऊन त्यास खिदाडून काहडावे याचा निस्चेचे याप्रमाणे त्याचा निस्चेचे त्याप्रा ईश्वर काये करितो की न कळ त्याचे भाऊ अबदुल वहबखान हजार श्वार दोनी हजार श्वार तीनसे फरगीनसी त्रिवलूर चेनापटणासमीपं परगना आहे तेथें जमा जाहले आहे तेथून कचीकडे येणार मधे मुरारराव आहे वेलूरचे किलेदाराच वर्तमान त्याजेपासी दीड हजार श्वार ( दी ) दोनीसे स्वार हजार प्यादे पुदचेरीवाले मुरारराव वेलुरवाले त्रिवर्ग येकठाई होणच विचारास बोलीचाली लगली आहे याची बातमी चालत नाही आरकाटचा मार्ग नीट चालू देत नाही मार्गी मुराररावजीचे राऊत फिरताती अवघे किलेदाराच मनोगत या देशामधें महाराजाच अमल जाहलियाने आपल अनभव जाईल नानापरी विचारत पडले आहेत या समई सेवक समक्षे मी असतो तरी चितानसार सरदार घेऊन येतो नवा मुलुक महाराजाचे प्रताप ईश्वर दिल्हा पुढहि उदंड देतो माझे भाऊबंधू पुतणे पुत्र कुटुंब फार आहेत तैनाती आहे ते श्रुतच आहे मजवरी कृपादिस्टि व्हावी तरी नावरूपास पाऊन अनवस्त्रानिसी माहराजास दर घडीस विनंती न करावी सारिख केलियाने मोठी कीर्ती अस विशश काये लिहिण हे विनंती मुलुक तमाम जाळून चंदावर व पटणच मुलुकांत गेले लस्करा आसपास फौज फिरते रस्त येऊ पावत नाही यैस विचारा आस मुरारराव चंदीवरी उतरोन आरकाट कैची गीर्दची गुरे आणून विकीत असतां पुदचेरीचा कारभारी पापयेपिला म्हणून आहे त्याने सोवला हजार रूा देऊन गुरे सोडऊन आपणाकडे घेतली रयेतास बोलाऊन म्हणतो जे गावास येक माणूस पुदचेरीमध्ये उल ठेवणे ज्याची गुर त्यास देवितो यैस बळकावि करितो मुलुक तीनदा लुटिला थोर थोर साहुकार बंदर धरून बसले आहेत नवाये ते लोक थोर थोर कबिले घेऊन वेलूरचे आसरेस जाऊन बसले आहेत ज्या गावास आसरा नाही ते गाववाले घर टाकून दुसरे मुलुकास गेले छ १५ तारिखेस वर्तमान आले जे मुरारराव जरीदा पुदचेरीसमीप बाहीर बुनग चंदीवर ठेवून गेला सामोर कपितान येऊन घेऊन जाणार त्यास करार केले बितपसील

( १ ) आरकाटचा बंदोबस्त होये पावेतो दरमाहे १२५ सवालाख रूा देत जावे सध्या नगद च्यारी लाख रूा द्यावे दोनी लाख अता द्यावे अरकाट घेतलेवरी दोनी लाख द्यावे

( १ ) ताडपत्री वगैरे कडपेचे मुलकात अरकाटचे तालुके परगणे आहेत त्याची जागीर सनद सलाबतजंगाकडून आणून द्यावे

( १ ) अरकट त्रिर्चनापली चोथ सरदेशमुखीची सनद सलाबतजंगाकडून आणून द्यावी

( १ ) घाटावरील च्यारी किले द्यावे त्याचा तपशील शोध करून लिहितो

येणे प्रो मतलब करून द्यावे पुढ माहराजाकडील फौजा आलिया श्रीरंगपटणवाले पुदचेरीवाले व मुरारराव त्रिवर्ग येकत्र होऊन जुजावे अमल होऊ देऊ नये त्यास वेलूर बादवसी व कर्नाटकगडवाले त्यास सामील होऊन साहित्ये करावे पुदचेरीवालेकडून आरकाटचा नायेब सुबा पापयेपिलेस घेऊन आरकाठी बसवावे येसे निस्चये जाहल आहे तेथे माहराजासी मुसा भुसीने सुला तेणप्रमाणे केला येथ पुदचेरीवाला फरारीस मनास आला सारिख करितो मुरारराव तो लुटेरा कवणेपरी दोनी पैसे मिळवावे बळवंतास हाती धरून त्यामुळ नाव करावे हे हव्यासाने घेरिल आहे पुदचेरीस तो काही बळ नाही इगरेजा खाले जेर आहे परंतु मुलुख बुडाला आमदानी बंद जाली सिपाहचा तगादा देण लागल त्यास्तव कितेक त्याचे आप्त नवाब मा। अलीखानास मसलत देतात जे माहराजाचा भरवसेने लडाई करीत आजी साह महिने बसले राहिलेत ते तो दूर राहिल त्याचा त्यास श्वार्थ लागला आहे तुमची फिकीर कैची करतील तरी विलंब कडून होईल प्रस्तुत यासी समध पडला आहे त्रिचंनापली नंदराजास देणे आरकाटचा बदबदोबस्तही करून देताती मुराररावजीसहि बोलाऊ घेताती पुढ खर्चास लाग ते देऊन कामहि चालविताती म्हणून मसलत देतात परंतु यैकोन विचारात पडले आहेत हे वर्तमान पूर्वी लिा।च होत लोकाचे सांगितले प्रो त्यानी केलियाने पुढ इगरेज व नवाब मा। अलीखान नंदराज मुरारराव अवघे येक जाहलिया आम्हास रुजू होण दुस्तर साहे नंदराज याने सरकारची पत्रासी अमर्यादा फार केली आहे मनामधे ती क्रोध फार भजला बांधितो माहराजास तो बाधील अपूर्व नाही दूर पथ येथून पत्र गेलिया दोनी महिने वाचोन उतर येत नाही पत्र होणेस आठ पंधरा दिवस लागताती येथ तो विचार येण परी आहे दिस्टिन पाहिल कानाने यैकिल लिहित जातो इगरेजास नवाब मा। अलीखानास हाती धरून काम केलियाने मुलुकचाहि बंदबस्त नीट पडेल पटणवालेसहि त्रिचंनापलीत आपली फौजा बैसोन जैस बंगालेचा मुलुक रघोजी बावजी सोडवीत गेले तेणेपरी पटणाचाहि मुलुक सुटत जाईल त्याचा गर्व भग करा व त्याचे वकील तो तेथ रुजू जाहले असतील त्यास चेस्मनु काई दाखवून लस्करात राहून दबावेस जाहलिया पुढ भये उत्पात होईल पैकेवालेससी कजिया कडा पडो त्याजकडून काही तकसीर घडो येस इश्वरापासी मागावे माहराज पुनेवान जेथ दिस्टी दिस्टी होईल आवघे पादाक्रांती होतील विचार सुचला तो लिा। आसे हे विनंती

इगरजाची जाहज दोन तीन दिवसांत येतील विदित होये

---

# १५ दीक्षितांचीं पंतप्रधानांस पत्रें

( डॉ. मो. गं. दीक्षित, शेंदुर्णी )

पे. द. } श्री { ज्येष्ठ शुा २ शके ?
ले. २०

श्रीकृष्ण

श्रीमंत राजेश्री बाजीराव पंत प्रधान

यांप्रति नारायण दीक्षित कृतानेक आशिर्वाद ऊपरि आपण सहकुटुंब गंगातिरी महाराजांचे अभीष्ट चिंतन करुन ज्येष्ठ शुद्ध दितीया पर्यंत सुखरुप असो विशेष सर्वदा जेधवां स्वारीस जातां त्या समयीं आम्हास पत्र लिहिता या समयी न लिहिले विशेष सांप्रत पत्र पाठविले आहे तर सविस्तर वर्तमान लिहिणे बरे **जा कार्यास गेलेत आहा ते कार्य ईश्वर सिद्धिस नेयील** आपले देशचे ब्राह्मण आहेत तितक्यांही ब्राह्मणांचे पुण्ये करुन तुह्मास यश येयील. कळले पाहीजे शत्रूचा पराजय झाला म्हणजे सविस्तर वर्तमान लिहित जाणे विशेष कायगांवचे सनदेचे वर्तमान तर आजिपर्यंत सनद आली नाहीं तुम्ही त्याचा विश्वा(स) धरिलात तो आहे तो कळलाच आहे बरे जे जाले ते बरे जाले पुढे त्या गावाविषयी काही लिहाल तर तुम्हास शफत असे तेथे विप्रकूळ आहे तो पूर्वांपासून तुम्हास ठावकाच आहे त्याचा गाव तर न लगेच असे तीनदा जाले आता त्याचा परामृश ईश्वरच करीत तेधवाच गावाची गोष्ट बोलूं कळले पाहीजे सज्ञांप्रति बहुत काय लिहिणे हे आशिर्वाद

---

पे. द. } श्री {
ले. २१

श्रीमंत राजश्री आपा यांप्रती

वासुदेव दीक्षित अनेक आसीर्वाद उपरी येथील क्षेम जाणून स्वकीये कुशळ लेखन केले पाहीजे विशेष. बहुत दिवस आपणाकडील पत्रे येऊन वर्तमान कळत

---

पत्र बाळबोधींत; कायगांव–विषयीचा मजकूर निजामास अनुलक्षून आहे. दुसऱ्या एका अप्रसिद्ध पत्रांत "राा राउ आपले नांवे गांवचे पत्र मागत असतील तरी देतो आणखी कोण्हा ब्राह्मणाचे नांवे गांव देणार नाही" असा मजकूर आहे; कायगांवची शाहूची सनद–१६ सप्टें. १७१७ रोजीं; कायगांवचा सरदेशमुखी अमल–२ नोव्हेंबर १७२४ रोजीं मिळाला. कायगांवची निजामी सनद–२८ मे १७३३ रोजी मिळाली. कायगांवास दीक्षितांचें वास्तव्य १७१६ पासून आहे. कायगांवास बादशाही सनद २७ जुले १७४१ ची मिळाली आहे.

नाही येसे न पाहिजे सांप्रत काशीहून पत्रे आली आम्हास बहुत रागेजून लिहिले की तुम्ही राजश्री येजमान कोणे प्रकारे वर्तणूक करीतात हे लिहीत नाही येथे परस्परे कितीक गोष्टी आईकितो व रा।। बाबुजी नाईक आपले घरी लिहीत असतात तरी तुम्ही न ल्याहवे याचे कारण काये बहुधा तुमचे त्यांचे एकमत जाले असेल व खुशामतही लागली आहे तस्मात तुमचेही संसर्गास संकल्प करावा येसे दिसोंन आले या प्रकारे क्रोधे लिहून व दोन पत्रे तुम्हास असी उभय कासीद अजूरदार करुन पाठविली तीच बजिनस आपणाकडे रवाणा केले असेत तरी याचे प्रत्योत्तर काये असेल ते लिहून देऊन कासीदास वाटे लाविले पाहिजे आम्ही पत्रे येतात ती पावती करीत नाही म्हणून कासीदच पाठविले कळावे म्हणून लिहिले असे व पूर्वी पत्रे रा बाबुजी नाईक जोसी यांजकडे पाठविली होती तीही पावली असतील बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद

---

पे. द.
ले. २२ } श्री { श. १६६१ ज्येष्ठ वद्य ५
१४ जून १७३९

श्रीकृष्ण

चिरंजीव चिमाजी आपा याप्रति

नारायण दीक्षित आशिर्वाद उपरि तुमचे अभिष्ट चिंतन करून ज्येष्ठ वद्य ५ पर्यंत गंगातीरी सुखरूप असो विशेष तुमचे पत्र बहुत चुकरायीचे आले ते आयकोन चित्तास बहुत श्रम जाले तर कांहीं चिंता मात्र न करणे ईश्वर सर्व अरिष्टे दुर करील द्रव्य मिळाले नाही म्हणोन लिहिले तर **एक जय जाला त्यापेक्षा धन अधिक नाही** ब्रह्मस्व जाले म्हणोन लिहिले तर ब्रह्मस्वाचा परिहार होये अशी ईश्वराची प्रार्थना करीतो कळले पाहीजे चिरंजीव हरभट्ट अग्निहोत्री मुखवचनें सांगता कळो येईल बहुत काय लिहीणे हे आशीर्वाद

---

१ पत्र बाळबोधींत; श्री. य. न. केळकरकृत, वसईची मोहीम २।८ ह्यांतील मजकूर ह्या पत्रावरून घेतला असावा. मात्र तेथें चिंचवडकर देवांनी पत्र लि।। असें म्हटलें आहे तें अर्थात् चूक वाटतें.

वसईस जय मिळावा म्हणून वासुदेव दीक्षितांकरवीं पेशव्यांनीं अनुष्ठान केलें होता पहा पे० द० ३० ले. २२९.

पेशवे दप्तर
ले. २३

श्री

जून ६-१७४६

श्रीकृष्ण

सहस्रायु चिरंजीव राजमान्य राजश्री बाळाजी
बाजीराव पंत प्रधान याप्रति

श्री वाराणशीहुन नारायण दीक्षित अनेक आशीर्वाद उपरि येथील क्षेम जाणोन आपले कुशल लिहित जाणे तेणे करुन समाधान होईल यानंतर तुम्ही पत्र पाठविले पावोन बहुत समाधान जाहाले यानंतर तुमची मातुश्री[1] श्रीयात्रेस आली उत्तम आम्ही सांगितल्याप्रमाणे यात्रा बरीच केली जे कर्तव्य ते आम्हास पुसोनच केले आता कार्तिक स्नाने करोन गयेस जाणार आहेत[2] सत्वरच गयादर्शन करून माघस्नानास श्री प्रयागी जातील यानंतर येथे उपाध्यपणाचा कज्या करितेत त्यास तुम्ही पत्र भास्करास लेहून दिल्हे आहे त्यावरून आम्हास हेच कळो आले जे हेच तुम्ही साक्षात बाळाजीच आहां पूर्व स्मरोन लेख करुन त्या मुलास दिल्हे हेच पाहोन आम्हास अतिसमाधान जाहाले येथेही परस्पर शोध करिता तुमचा उपाध्या भास्कर दक्षा असे असता लटका कलह करीतेत तर तुम्ही पूर्व स्मरोन लिहोन दिल्हे तेच सत्य करणे येथे तर आम्हास बोलता येत नाही तरी स्पष्ट लिहोन पाठविणे वरकड पुस्तका-करीता लिहिले तर पुराणे येथे शोध केला परंतु प्रति मिळत नाही प्रतिच्या उद्योगामध्ये आहो प्रति मेळवून लेहावयासि आरंभ करूं अग्निपुराण वायुपुराण ब्रह्मपुराण लिंगपुराण विष्णुपुराण ही शिध आहेत आणिक जी मिळतील ती लेहवितो वरकड वर्तमान विसाजीपंताच्या[4] पत्रावरून कळो येईल सुज्ञाप्रति बहुत काय लिहिणे

तुम्ही वर्षासनाची पत्रे लेहून देता परंतु हा विचार करीत नाही जे याचा खर्च काय मी करतो काय हे चितात आणून करणे.

येथे दीडशत रुपये वर्षाशन नरहरभटास[5] होते आता येक स्त्री येक मूल आठा वर्षांचा ऐसे असता अणीक पत्र पत्रास देणे म्हणऊन लिहिले परंतु आपण दीड शत रुपये देतो

प्राणनाथभटास[5] दोन शत व वेंकटशास्त्री शंभर देणे त्यास ऐवज नाही आपल तीन शत रुपये दिल्हे ते पाठऊन देणे आमची वासना आहे माघमाशी देशास येऊन परशुरामदर्शन करुन तेथे शत अग्निहोत्रे करून त्या स्थळी ब्राह्मणभोजन करावे याजकरीता येतो कळावे म्हणऊन लिहिले असे

---

पत्र बाळबोधीत. (१) मातुश्री = काशीबाई. (२) पहा पे० द० १८ ले. १४१; ४० ले. ४२,४४,४९ (३) उपाध्येपणाच्या भांडणाच्या निवाड्यासाठी पहा. बाळाजी बाजीराव रोजनिशी भा. १ पृ. ११५-११७ हा काशीबाईंचरोबर यात्रेत होता.




गोविंदभटानें थोरल्या बाजीरावाचे पत्र युक्तीने मिळविले होते ते रद्द करावे गणले. गोविंदभट लुच्चा होता. दीक्षितांचे एका पत्रांत "गोविंदभट्ट वझे आम्हांस दैत्यवत् दुःख देतो" असा मजकूर आहे. (४) निसाजी दादाजी कोल्हटकर

(५) नरहरभट सप्रे व प्राणनाथभट गाडगीळ ह्यांचे उल्लेख दीक्षितांचे पत्रांतून वारंवार येतात.

(४) रा. सं. ३, ले. ४०३ वरून ह्याचे आई-वडील व वडील काशीसच राहिले होते असें समजतें.

---

# १६ छ. शाहूकालीन फारकत.

(श्री. य. रा. गुप्ते, बी. ए., एम्. आर. ए. एस.
सेवानिवृत्त रजिस्ट्रेशन इन्स्पेक्टर, पुणें ५)

प्रस्तुत फारखत मी इ. स. १९२९ सालीं पुणें जिल्ह्याच्या खेडचा सब रजिस्ट्रार असतां माझ्या एका मित्रानें दुसऱ्या एका महत्त्वाच्या ऐतिहासिक कागदाबरोबर आणून दिली. ती थोडी त्रुटित असून शक १६५० इ. स. १७२८ तील म्हणजे थोरल्या शाहू छत्रपतींच्या हयातींतील आहे. तींत कडूसचे मोरो गोविंद कुलकर्णी व गोविंद विनायक कुलकर्णी यांचीं नांवें आहेत. ती अशी—

ले. २४ } { श. १६५० मार्ग. व. १३
इ. १७२८ डिसें. १७

*फारखती सके १६५० कीलकनाम छवछरे
मार्गस्वर वदी १३ मगलवार[१] ते दिवसी रा। मोरो
गोविंद कुलकरणी का। कडूस यांसिः--[२]
उधावा तानवडी फारखती लेहा (हू) न दिधली
यैसी जे. आमचे पैका तुमचे पिते गोविंद
विनायक कुरकरनी याजकडू(न) रु ५१६।~
होता त्याचा रोखा आपण पासि हा (हो) ता. तो
हिशेब तुम्ही का। कडूस येथ वारून

---

२. चिन्हें मीं घातलेलीं आहेत. अस्सलांतील तीं नाहींत. * पा. स. १६।६४

आपण घेतला तुमचा आमचा काही समधे
राहिला नाही, तुमचे पिते याचे आता

[ उलटून ]

नव्हे.

[ थोरल्या शाहू छत्रपतींचे वेळीं सामान्य दस्तऐवज किती लहान कागदावर लिहीत याचा मासला फारखतीच्या तुकड्यावरून दिसेल. पण कुलाबा जिल्ह्यांत या काळीं याहीपेक्षां लहान कागदावर लिहिलेले दस्तैवज मीं पाहिलेले आहेत. ]

---

# १७ वडू-शिवले देशमूख

( श्री. शं. ना. जोशी )

मू. दा. ५. } ( २१ ओळी फारसी मजकूर ) { श. १६५५
ले. २५ } { इ. १७३३

इ महजर हाजीर मजालेसी मामले जाफराबाद उरुफ चांदवड सुा सन ११४३ व तारीख माहे आजम काजी व हजूर

समेराउ देसमूख वीनती — सिवाजी विस्वनाथ
काजी—महमद कमरदीन हाकीमशरा — देशपांडिये दाा ( सुाा ! ) ऊखुप
विठोजी गोपाल देशपांडिये

गणेश त्रिमल वकील—विठोजी हीरदेऊ चिटनवीस

कसबे चांदवड नाइकवाडी

समेराऊ देसमूख मोकदम रायाजी जाधोराऊ माहाजन तिसमाजी विस्वनाथ सेटिये

कुलकर्णी ——— ——— वामनभट धर्मात्कारनी ———

( मोकळी जागा )

सदरहू मोख्तसर बैसोन महजर केला यैसा जे मंगाजी वलद देउजी इबन आऊजी पाा ढोंके पाटील व सेखजी वलद भिवजी इबन ——— पाा व संतजी वलद गोंदजी इबन ——— पाा काळे व नाउजी वलद लखमजी इबन गाऊजी पाटील काळे व भिकजी वाा संभाजी इबन भिकाजी पाटील ढोंके मौजे रेडगांऊ खुर्द मामले मार येऊन जाहीर केलें कीं आपण तुटक बेमवसर कर्जदार, जालों गांवाची लावनी न होये कर्जदाराचा तागादा जाला व लावनीबदल दिवानची ताकीद जाली याकरितां आपसमधें मसलहत केली कीं आपल्यास कोन्ही मिरासभाऊ करून कर्ज वारून लावनी आबादी करावी सबब सुभानजी वलद मोरोजी इबन ——— सिवले मौ मौजे वोढंल पाा जुनर याजपासी जाऊन मीनतमाना करून आपले

मोकदमीपैकी निमे वतन नीरख करून किमत रुा ३५१ तीनसे एकावन घेऊन खरीदखत करून दिधले आनी निमे मोकदमीस काबीज मुा केलें ( आडव्या तिरप्या ओळींत शेरे ) खरीदखत सके १६४४ शुभकृत नामसंवत्छरे श्रावण शुध १३ दरोबस्त गांवाची निमे मोकदमी किमत रुा ३५१ ( = इ. १७२२ आगष्ट १३ )

सदरहू हकीकत जाहीर करून अर्ज केला की यासि ठानाचा महजर करून दिधला पाहिजे याकरितां अर्ज खातिरेस आनून नजर लावनी आबदी वर देऊन मौजे मार दरोबस्तपैकी निमे मोकदमी सुभानजी वलद मोरोजी इबन ——— यासि मिरासीचा महजर करून दिधला असे मोकदमीचा हकलाजिम इनामती पासोडी व आडेपारडें व सेळावाडी व तेलधार व सेवसचजी वगैर जिराईत व बागाईत व काळी व पांढरी रान तुण झाडझाडोरा निमेनीम घेत जाणे माना-पैकी नांव नागर १ होळीची पोळी १ दसरियाचा मान १ व घरठाना इमारतीस जागा बाा मंगांजी पाा वाडा १ व बाा सेखजी पाा वाडा १ येैसे दोन्ही वाडे सुभानजी वलद मोरोजी इबन ——— यासि दिधले असेत तेथें खातिरेस येईल तैसी इमारत बांधून सुखें लेकराचे लेंकरी नांदून मौजे मारची लावनी कीर्दी मामुरी करून मिरास अरजानी करणे सिरपाव दिवानची लुगडी व पाणे १ व पोल्याचे बैल १ व दिवालीचा मान १ येैसे तीन मान मंगाजी वगैरे घेतील पेश्तर मंगाजी व सेखजी व संतजी व नाऊजी व भिलाजी मोकदम याचे बाप भाऊ अवलाद अफलाद वेलिजदार कोन्ही नवदिगर करतील त्यासि मगाजी वगैरही निवारन करणे सदरहू तवरकचाद सुभानजी वलद मोरोजी इबन ——— यासि मिरासीचा महजर करून दिधला सही दाा सिवोजी+ विश्वनाथ देशपांडिये ( फारसींत 'बैजा' आहे. )

---

ह्या महजराचें लिखाण लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. क आणि ला ह्या मोडींतील अक्षर वळणामधील स्पष्टता ह्यांत सर्वत्र व चांगली केली आहे. क–च्या दोन्ही गांठी भरीव आणि ला–मधील पहिली गांठ पोकळ व दुसरी भरीव आहे. ज व न किंवा जा व ना मधील फरकहि असाच स्पष्ट आहे. उच्चरित व व्याकरणाचें अनुस्वार लेखकानें दिलें आहेत. स्वाक्षरी करतां 'विनती' किंवा दाा ( दसकत ) उ, हें लिहिलें आहे. अर्थात् हें अक्षर भिन्न वळणाचें आहे; महजर असल आहे. पण महिना आणि तारीख घालण्यासाठीं जागा मोकळी सोडली आहे उपस्थित मंडळींचीं नांवें लिहि-ण्याच्या जागीं जर जागा व रेघ ओढून मोकळी टाकलीच आहे. पण खुद्द महजराच्या मजकुरांतहि व्यक्तिनामांत आजाचें नांव लिहिण्यासाठीं इबन—च्या पुढें जागा सोडली आहे. पा. स. ५।६६

+ अक्षर वेगळें. कागदास तीन जोड असून जोडगीरीवर तिन्ही ठिकाणीं फारसीं एकाच अक्षरांतील 'सही असल' असें लिहिलें आहे.

# १८ बाजीराव बल्लाळ यांचीं वऱ्हाडच्या राजकारणाचीं तीन पत्रें

( श्री. यशवंत खुशाल देशपांडे, शारदाश्रम यवतमाळ )

पुढील तीन पत्रें बाजीराव बल्लाळ पेशवे यांच्या वऱ्हाडसंबंधाच्या कारभाराचीं द्योतक आहेत. हीं अस्सल पत्रें कै. यादव माधव काळे यांच्या संग्रहांतील असून हल्लीं तीं मध्यप्रांत संशोधन मंडळाच्या संग्रहांत आहे. पत्र नं. १—ले. २६ वर बाजीराव यांचा सामान्य दरबारी शिक्का आहे. हें पत्र बाजीरावानें सिंदखेडकर मानसिंगराव जाधव यांना लिहिलें आहे. सिंदखेड, खेडले ( फत्तेखर्डा ) हे वऱ्हाडांतील परगणे व इतर कांहीं परगणे हे जाधवराव यांचे जागीर परगणे असल्यामुळे नबाबाकडून जागीर करून घ्यावे म्हणून शाहु छत्रपति यांनी आनंदराव पंडीत सुमंत यांना आज्ञा केली. त्यावरून बाजीराव यांनी मानसिंग जाधव यांना हें पत्र लिहिलें. सांप्रत नासरजंग नबाब दिल्लीस गेले तिकडून परत औरंगाबाद येथें आल्यावर त्यांची भेट होईल तेव्हा इतर ज्या राजकारणाच्या प्रश्नाचा गुंता उरकेल त्याच वेळीं या जागीर प्रकरणाचीही कामगिरी पूर्ण होईल. दौलताबाद सरकारचे वतन जाधवराव यांचे आहे त्याचा रुसूम जाधवरावास निर्वेध मिळावा म्हणून मराठ्यांचा कमावीसदार तेथें आहे त्यास ताकीदपत्र दिल्याचेंही त्या पत्रांत नमूद आहे. शेवटीं त्या भागांत बाजीराव आले म्हणजे मानसिंगरावांची भेट होईल म्हणून आश्वासन आहे. पत्रांत सन नाहीं पण संदर्भावरून काळ काढतां येण्यासारखा आहे. त्या वेळीं निजामाचे व पेशव्यांचे संबंध सलुखाचे दिसतात. तसेंच मोगल प्रांतांत चौथाई वसूल करणारे मराठ्यांचे कमावीसदार निर्वेधपणें कारभार करीत असें दिसतें.

पत्र नं. २—ले. २७ हें आज्ञापत्र शाहुमहाराजांनी राज्याभिषेक शक ५९ या वर्षी म्हणजे इ. स. १७३३ च्या सुमारास फत्तेखेर्डा येथील सरदेशमुखीचा वसूल करणाऱ्या कमावीसदारास लिहिलें आहे. या आज्ञापत्रावर बाजीराव बल्लाळ आणि श्रीनिवासराव पंडीत या उभयतांचे शिक्के असून शेवटी सुमंत, मंत्री इत्यादिकांचे आठ शेरे आहेत. या आज्ञापत्रांत फत्तेखेर्डा येथील देशपांडे उदाजी यादव याचा आलमगीरच्या वेळेपासून सायर जकातीस तीन रुके प्रमाणें हक्क आहे तो सुरळीत प्रमाणें त्यास घेऊं द्यावा असा हुकूम आहे.

पत्र नं. ३—ले. २८ हें पत्र बाजीराव यांनी रामाजी नारायण यास लिहिलें आहे त्यांत अरबी सन असून त्याचा काळ इ. स. १७२७ चा अंदाजानें येतो. त्या

पत्राप्रमाणें वऱ्हाडांतील कुरनखेड परगणा हा दवलतराव शिर्के यास मोकासा असून त्याचेतर्फे तेथे वासुदेव शिर्के हा कमावसिदार आहे. त्यास चौथाईच्या अमलवसुलींत ' खलल ' करूं नये म्हणून हुकूम दिला आहे. रामाजी नारायण हा मराठ्यांचा अधिकारी दिसतो. या पत्रावर बाजीरावाचा शिक्का नाहीं पण शेवटीं लेखनसीमेचा शिक्का आहे. हें पत्र बाजीराव यांचें स्वतःच्या हातचें दिसतें. हीं तिन्ही पत्रें मराठ्यांच्या चौथाई सरदेशमुखीच्या वसुलीच्या कारभाराचीं द्योतक आहेत.

ले. २६ — श. १६६१ चैत्र व. २ / इ. १७३९ एप्रिल १४

राजश्री मानसिंग जाधवराउ गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—श्रो। बाजीराउ बलाळ प्रधान आसिर्वाद

श्री
राजा शाहु नरप
पति हर्ष निधान बा
जीराव बल्लाळ
मुख्य प्रधान

उपरी येथील कुशल जाणुन स्वकीय कुशल लिहिले गेले पाहिजे विशेष तुम्ही पत्र पाठविलें ते पावले आसेल जागीरीचे परगणे सिंदखेड व खेडले पडतुर सेवली रोशनगाव नबाब निजामन्मुलुक याजकडुन करार करून घ्यावे म्हणून महाराज राजश्री स्वामीनी राजश्री आनंदराउ पंडीत सुमंत यास आज्ञा केली कागदपत्र नबाबास करून दिल्हे तो नबाबाचे जाणें दिलीकडे जाहले त्यामुळें ते गोष्ट तैसीच राहिली प्रस्तुत उत्तरेकडील प्रसंग विज्वर जाहाला सर्व प्रसंग आपले स्वाधीन जाहला आहे तरी हे परगणे आपले स्वाधीन केले पाहिजेत म्हणोन कितेक तपसिलें लिहिले तें सविस्तर कळों आलें ऐशियासि तुमचे सर्ववीशी चालवावे हे परम अवश्य आहे तुम्हापेक्षां दुसरें अधिकोत्तर आहे ऐसे नाही परंतु तुम्हाकडील प्रसंग करून देणे तो निक्षूण करून घ्यावा लागतो याकरितां नबाब नाशरजंग माघारे फिरोन औरंगाबादेकडे येणार ते लौकरीच येतील त्यांची आमची भेट होईल ते समई कितेक विचार कार्यभागाचे होणे ते होतील तदोत्तर तुमचा प्रसंग करून घेणे तो त्यांचे आमचेच वीचारे करून घेतला जाईल जे करणे ते पायासुध करावे लागतें याकरिता आम्हास तुमच्या कार्याचें अगत्य आहे नबाबाचे भेटी नंतर आपले कार्य करून घेतले जाईल दौलताबाद सरकारचा वतनी अमल आपला आहे तरी कमावीसदारास ताकीद पत्र पाठवावे की रुसूम हक सुरळीत पावें म्हणून लिहिलें त्यावरून कमावीसदारास ताकीद पत्र पाठविलें आहे त्याप्रांते आलियावरी भेटही होईल जाणिजे छ १६ मोहरम बहुत काये लिहिणे लेखन

सीमा

ले. २७ } श्री { श. १६५४ कार्तिक वद्य ४
{ इ. १७३२ आक्टो. २६

श्री श्रीनि
राजा शाहु न वास
रपति हर्ष निधा- पंडि
न बाजीराव बला-
ळ प्रधान

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५९ परिधावी संवत्सरे कार्तीक बहुल चतुर्थी गुरुवासरे क्षत्रीयकुलावतंस श्रीराजा शाहु छत्रपति स्वामी याणी कमावीसदार दिमत सर-देशमुखी प्रा साखरखेडले यासी आज्ञा केली ऐसी जे उमाजी यादव देशपांडे पा। मजकूर यास मोगलाई तर्फे जे सायर जकातीस हक दर टक्यास रुके ८३ ती यायर-हुकूम परवाना दिवाणी दरहद प्रांत शाहआलमगीर चालत आहे त्या प्रो चालवावयाची आज्ञा केली आहे तरी परवानेचा सुदापत सायर जकातीस तीन रुके प्रा हक सुरळीत देणे जाणीजे लेखनालंकार मर्यादेयं
राजते

(पट्कोनी शिक्का)

हुजु सुरु संमत सा। सा। बार सुद सुरु सुद बार बार बार बार
नीवीस सुमंत मंत्री सरकार

---

ले. २८ } { श. १६४७ माघ शु. ५
{ इ.१७२६ जांने. २७

(बाजीराव बल्लाळ पेशवे यांच्या हातचें पत्र)

श्री

राजमान्य राजश्री रामाजी नारायेण
गोसावी प ।।। स
सेवक बाजीराव बल्लाळ प्रधान नमस्कार
सु॥ सीत असरैन मया आलफु राजश्री
दवलतराऊ सिर्के यासी परगणे कुरुन
खेड मोकासा आहे तेथे वासुदेऊ विष्णु
सिर्के याचे तर्फेने कमावीसदार आहे
ऐसे असोन तुम्ही परगणे मा॥री स्वार
आणुन धामधूम करून डोहणा करि
ता म्हणोन हुजुर विदित जाले तर हे
× × × × × × × × × × × × × (एक ओळ फाटली)

आम्हाजवळी आहेत याउपर तुम्ही पर ( गणि )
यात धामधुम करून चौथाईचा
आमलास खलेल होईल म्हणजे तुमचा
मुलाहिजा होणार नाही यैसे परिछीन
समजोन बोभाट येउ न देणे ताकीद अ( से )
जाणीजे पाा मार पैकी सालमारी मो
कासबावईचा यैवज घेतला असेल तो फिरो-
न माघारा देणे जाणीजे छ ४ जमादिलाख
र लेखन
सीमा

---

## १९ परिंचकर जाधव व घाटगे आणि संताजी घोरपडे

( श्री. शं. ना. वत्स जोशी. )

पुढील १० पत्रें मंडळाचे सभासद रा. **कृष्णराव भाऊराव बाबर** एज्यु. सुपरवायझर डि. लो. पुणें यांजकडून मिळालीं. सर्व पत्रें अस्सल व महत्वाचीं आहेत. त्यांचा काल इ. १६९३ ते १७११ हा आहे. इ. १६९३ मधील पत्रें ४ असून त्यांत पिराजी घाटगे हा साधा शिलेदार होता; पुढें सेनापती संताजी घोरपडे यांच्या सांगण्यावरून त्यास शिलेदाराची सहस्त्री मिळाली. आणि परिंचकर गणोजी जाधव, हे सप्तसहस्त्री होते, त्यांच्या ताबीन राहून त्यानें आपली कामगिरी करावयाची आहे. त्यांस खास ७०० पातशाही होनाची नेमणूक करून दिली आहे. पुढें गणोजी हा स्वामीकार्यी कस्त जाला म्हणून परिंचे हा गांव इनाम दिला आहे. परिंचे हा गांव पुरंदर किल्ल्याकडे, जाधवांकडील काढून दिला होता, पण पुनः तो जाधवांना दिला आहे. अशी बरीच महत्वाची माहिती आली आहे. पा. स. ७६५

| | | |
|---|---|---|
| ले. २९<br>मू. दा. प. | श्री | श. १६१४ माघ वद्य ८<br>इ. १६९३ फेब्रु. १७ |

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके १९ अगिरातम संवत्सरे माघ ××××× कुलावतौंस श्री राजाराम छत्रपति

( निळो मोरेश्वराचा लंब वर्तुळी शिक्का ) ( प्रल्हाद निराजी प्रतिनिधि याचा अष्टकोनी शिका ) ×××××

श्री शिलेदार यासि आज्ञा केली यैसी जे तुमचे विषयी राजश्री संताजी घोरपडे सेनापति याणी चंदीचे मुा विनंती केली की राा **पिराजी घाटगे** पेशजी शिलेदार होते यैशीयाशि यानी स्वामीच्या पायाशी येकनिष्टता धरून आपणा समागमे देशीहून कर्नाटक प्रांतास चंदीस येऊनु स्वामिसेवा येकनिष्ठ करीत आहेति तरी याशि शिलेदाराची सहस्त्री ×××××××

---

ले. ३० } श्री {श. १६१४ माघ वद्य ८
मू. दा. प. } {इ. १६९३ फेब्रु. १७.

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके १९ अंगिरानाम सवत्सरे माघ बहुल अष्टमी भृगवासरे क्षेत्रीयेकुलावतंस श्री राजाराम छत्रपति याणी देशाधिकारी व लेखक वर्तमान व

| | |
|---|---|
| ० ७ श्री लक्ष्मि श्री राजाराम नृहरिप्रीते नरपाति हर्ष निदान मुद्रानीराजी मोरेश्वर सुन नीळकंठ जन्मनः ॥ राजा मुख्य प्रधान राम प्रतिनीधि प्रल्हादस्य विराजते | भावी सुभा प्रा सातारा यासि आज्ञा केली यैसि जे रा गणोजी बिन बाळोजी ××× ( जाधव ) विषई राजश्री संताजी घोरपडे सेनापति याणी चंदीचे मुकामी सनिध येऊनु विनति केली यैसि जे गणोजी बिन बाळोजी जाधव याणी श्वामिच्या पायापाशी येऊनु येकनिष्ठता धरून |

देशीहून कर्नाटक प्रातास चंदीस येऊन येक भावे सेवा करितातो याशि येक गाव नूतन इनाम करून यावयाशी ×× पाहिजे म्हणोनु विदित केले त्यावरून याजवरी रुपाळु होऊन मौजे कुसवडे तर्फ सातारा सुभा प्रा सातारा हा गाव नूतन इनाम करून देह १ येक रास कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी सहित खेरीज हकदार व इनामदार करून गाव इनाम करून दिधला असे याचे श्वाधिन करून पुत्रपौत्रादि वशंपंगरा चालवणे या पत्राची प्रति लिहून घेऊनु मुख्ये पत्र इनामदार मजकुरास परतोन देणे निदेश समक्ष मर्या

देयंविरा
जते

( पाठीमागे )

सा[1] रुजु[1]
तेराख[1] २१ माहे[1] जमादिलाखर * *
जमादिलाखर सन सलास, तिसैन
बार[1] सुद सुरु[1] सुद बार[1]

---

ले. ३१ } श्री {श. १६१४ फा. वद्य ९
मू. दा. प. } {इ. १६९३ मार्च २०

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके १९ अंगिरानाम संवच्छरे फाल्गुन वादि नवमी इंदुवासरे क्षेत्रियेकुलावतंश श्री राजाराम छत्रपति याणी देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी सुभा प्रा सातारा यांसी आज्ञा केली यैसी जे

---

१ हीं नऊ अक्षरें निरनिराळीं. * ही रुजू व बार आणि संमत केल्याची तारीख सनद दिली तीच आहे.

० ७

श्री राजाराम<br>नरपति हर्ष निदान<br>मोरेश्वर सुत नीलकंठ<br>मुख्य प्रधान

श्री लक्ष्मी<br>नृहारिप्रीते<br>मुद्रा निराजी<br>जन्मनाः ॥ राजा<br>रामप्रतिनिधे<br>प्रल्हादस्य<br>विराजते

जनाजी जाधव याचे विशई राजेश्री संताजी घोरपडे सेनापति याणि चंदीचे मुकामी संनिध येऊन विनंती केली यैसि जे जनाजी बिन हंसाजी जाधव थाणि स्वामिच्या पायापाशी येऊनु येकनिष्ठता धरून देशीहून कर्नाटक प्रांतास चंदीस येऊन येक भावे शेवा करित आहेति याशी येक गाव नूतन इनाम करून द्यावयास आज्ञा केली पाहिजे म्हणौन विदित केले त्यावरून याजवरी कृपाळु होऊनु मौजें चिचणेरे ता तारगाऊ प्रांत मार हा गाव नूतन इनाम करून देह १ येक रास कुळबाव कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी सहित खेरिजि हाकदार व इनामदार करून गाव इनाम करून दिधला आसे याचे स्वाधिन करून यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे या पत्राची प्रति लेहून घेऊनु मुख्ये पत्र इनामदार मजकुरास परतून देणे +जाणिजे +निदेश समक्ष

र्या<br>देयांवि<br>जते

( पाठिमागे ) रुजू

तेरीख २२ माहे रजब *

रजब सुा सन सलास तिसैन

बार सुद, सुरु सुद बार

---

ले. ३२<br>मू. दा. प.

१६१५ चैत्र व. ६<br>१६९३ एप्रिल १५

×××××××× द्यावयाची आज्ञा केली पाहिजे त्यावरून ××× स्वामि तुम्हावरी कृपाळु होऊन, तुम्हास **सिलेदाराचे सहश्रीचा कार्यभाग** सागितला असे तरी सिलेदाराचा जमाव करून राजश्री **गणोजी जाधव सप्तसहश्री** याचे तावीन राहून श्वामिसेवा करीत जाणे तुम्हास वतन सालिना होन पातशाही ७००८ चि ता खासा ××

---

१ दहाही अक्षरें निरनिराळीं. * ही रुजू पाहून बार केल्याची तारीख सनद दिली तीच आहे.

| | | |
|---|---|---|
| ४५० × × येकून | चाकर आा १८ ये रुप | |
| ४०२ ? | १४० घोडे | १० |
| ४८ ? | १६ दिवटे | २ |
| | १५ आत्फागिरिया | १ |
| | १५ माहलदार | १ |
| | १२ नेजदार | १ |
| | २० छुट नफर | २ |
| | १२ अफराद | १ |
| | *२५० | १८ |

एकूण सातसे होनु पा रास केले असेती हा सनद पो पासून खासा जातीस व चाकर व घोडी हाजीर तेरीखेपासून वजावाटाव दरबारदडकप्रमाणे वजा करून उरले वेतन घेत जाणे पूर्वील सर्वंचे फाजिले हाली हक वजा करणे तुम्हास जमान जनाजी जाधव वजारतमाब हुजूर घेतले आसेत जाणिजे निदेर्श+ समक्ष मर्या

सांा+ देयंविरा

रा+ा छ १८ साबान रुजू जते

तेरीख+ +२१ मा+हे जमादिलाखर

ज+मादिलाखर सन सलास तिसैन

बा+र सुद सु+रु सुद बा+र

---

ले. ३३ } श्री { श. १६३० माघ शु. ५
मू. दा. प. } { इ. १७०९ जाने. ५

स्वस्ति श्रीराज्याभिशेक शके ३५ सर्वधारी संवत्छरे माघ शुध पंचमी भोमवासर क्षेत्रियकुलावतंश श्रीराजा शाहू छत्रपति स्वामि याणी मोकदमानी मौजे परींचे

श्री ० / शाहु नर / पति हर्ष नि / धान मोरेश्वर / सुत भैरव / प्रधान

श्रीशंकर श्री / शाहुछत्रपती / रुपानिधी प्रल्हा / द सुत गदाधर / प्रतिनिधी

ता नीरथडी यांसी आज्ञा केली ऐसी जे रा येशवंतराऊ व जनाजी व आनंदराऊ जाधव यांचे स्वामीस चालवणे आवश्यक याकरितां यावरी स्वामी रुपाळु होऊन मौजे मजकुर नूतन इनाम कुलबाब कुलकानु मान्य करून खेरीज हकदार व इना-

---

+ १० हि अक्षरें वेगवेगळीं. +श. १६१४ माघ वद्य ८ इ. १६९३ फेब्रु. १७

* ही बेरीज २३० येते. २० होन कमी आहेत. कारण रु. २५० हे एकूण ७०० होण्यासाठीं पाहिजेतच.

मदार इनाम दिल्हा असे तुम्ही मारनुलेचे रजातलय वरतीन मौजे मजकुरचा आकार प्रमाणे वसूल मारनुलेकडे बिलाकुसूर देत जावे [१]जाणिजे [१]लेखनालंकार

मर्या

देयंरा

जते

( पाठीमागे )

[१]रुजु

[१]रा। छ ६ जिलकाद×

[१]बार [१]सुरु सुद [१]बार

---

लें. ३४ } श्री { श. १६३० माघ शु. ५

मू. दा. ५. } { इ. १७०९ जाने. ५

स्वस्ति श्रीराज्याभिशेक शके ३५ सर्वधारीसंवत्छरे माघ सुध पंचमी भौमवासर क्षेत्रियकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी यांणी समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री नारोपंडीत सचीव यांसि आज्ञा केली येसिजे रा। **गणोजी जाधव स्वामि कार्यावरि कस्त चाले** याकरितां याच्या पुत्रांचे चालवणे स्वामीस अवश्यक म्हणून **येशवंतराऊ व जनाजी व आनंदराऊ जाधव** यांस नूतन इनाम मौजे परिंचे ता। नीरथडी हा गाऊ मारनुलेस इनाम देऊनू तुम्हास आज्ञापत्र सादर केले असे तरि मौजे मजकूर कुलबाब कुलकानू मारनुलेस इनाम चालवणे प्रतिवर्षि नूतन पत्राचा अक्षेप न करणे +जाणिजे बहु+त लिहिणे तरी सु+ज्ञ असा

( पाठिमागें ) मर्या

+रा। छ ५ जिलकाद × देयंरा

जते

+ +

बार बार

---

१ हीं सातही अक्षरें निरनिराळीं लें. ३३,३४ जाणिजे हे लिहिणारा अधिकारी ऐकच आहे. तसेच रवाना लिहिणारा आणि पहिला बार लिहिणारा ऐकच आहे.

× ता. ६।१।१७०९ = माघ शु. ६ शक १६३०

+ हीं सहाही अक्षरें वेगवेगळीं.

ह्याच मितीचें ह्याच मजकुराचें पण ' देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत पुणें यासि ' लिहिलेलें पत्र आहे; तें येथें घेतलें नाहीं.

लें. ३५ } श्री { श. १६३१ चैत्र शु. १
मू. दा. प. } { इ. १७०९ मार्च १

˘ श्री ०
राजाराम
चरणी दृढभा
व सेनापति ध
नाजी जाध
व राव

आज्ञापत्र समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजेश्री चद्रसेन जाधवराऊ सेनापति ताां मोकदमानी मौजे परींचे ताा निरथडी सुाा तिसा मया आलफ मौजे मजकूर राा वाघोजी कदम यांजकडे होते ते दूर करून राजश्री स्वामीनी राा येसवतराऊ व जनाजी व आनंद्राऊ जाधव याजकडे इनाम करून दिल्हा आसे तरी तुम्हीं यांसी रुजु होऊन वसूल देणे [1]जाणिजे छ[2] २९ जिलकाद [3]मोर्तब सुद

विलसते
लेखनाव
चार[4] धि ( वर्तुली आकार )

---

लें. ३६ } श्री { श. १६३३ कार्तिक शु. ४
मू. दा. प. } { इ. १७११ नवं. ३

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ३८ खर संवत्सरे कार्तिक शुद्ध चतुर्थी मंद्वासरे क्षत्रियकुलावंतस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी याणी मोकदमानी मौजे परींचे ताा नीरथडी प्राा पुणे यासी आज्ञा केली ऐसी जे मौजे माार राा यशवंतराऊ बिन गणोजी जाधव यांस पेशजी इनाम दिल्हा आहे तो आलाकडे काहाडून किले पुरंद्रास दिल्हा होता ऐसास माारनिले येकनिष्ठ सेवक जाणून मौजे माार पुरंधराकडून दूर करून यांस वंशपरंपरेने इनाम पेशजी प्राो करार करून दिल्हा असे तुम्हीं यांजला रुजू होऊन गांवींचा वसूल यांकडे देत जाणे लेखनालंकार[1] मर्यां देयंरा जते

श्री
० ७
शाहुनर
पतिहर्षनि
धानमोरेश्वर
सुत भैरव
प्रधान
(आकार कोयरी)

---

१–४ हीं अक्षरें वेगवेगळीं.

(पाठमागे)
[१]तेरीख २
[१]सौवाल सुाा इसने
[१]बार सुद [१]सुर सुद [१]बार

---

ले. ३७ }
मू. दा. प..

{ ले. ३४ चा काल पहा.

(पत्राचा वरील बराच भाग फाटलेला आहे.)

×××××खेरीज हकदार व इनामदार ××××× मीनि राजपत्राप्रमाणे मौजे माार पैकी इनाम आपले दुमाला केला पाहिजे म्हणून विनंती केली येसियास गणोजी जाधव या राज्यातील स्वामी-कार्याचे येकनिस्ट या करितां मौजे माार पैकी नूतन इनाम विसा पाडाचे बिघियाणे जमीन चावर पांच ५ रास दुमाला *करावयाची आज्ञा केली असे तरी मौजे माार पैकी पां(च) चावर जमीन खेरीज हकदार व इनामदार राजश्री——चे आज्ञापत्र प्रांत माार सादर आहे त्याप्रा यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालविणें सालदरसाल नूतनपत्राची अपेक्षा न करणे ××××

---

# २० किले पुरंदर–पेठ शिवरात्रीची यात्रा

(श्री. ब. इ. आपटे)

ले. ३८ }
मू. दा. प.

श्री

{ श. १६५० माघ वद्य ७
इ. १७२९ फेब्रु. ९

द माा अनाम देशमूख व मोकदम व देशपांडिये को सासवड यासी बाजीराऊ बलाल

| | |
|---|---|
| ० श्री ७ राजा शाहू नरपति हर्षनि धन बाजीराव बलाळ प्रधा न | प्रधान सुहुर सन तिसा असरीन मया अलफ श्री मुकाम पेंठ किले पुरधर याची सिवरात्रीची यात्रा आहे त्यास काठ्या कावडी मंडप व हरीभक्त स्थळोस्थलीचे येऊन यात्रेचा समारंभ उतम प्रकारे जाला पाहीजे याकरितां तुम्हास आज्ञापत्र सादर केले असे तरी कसबे मजकुरी अणखी स्थलाचे यात्रेस जावयाच्या काठ्या कावडी मंडप असतील ते अगदी माघी |

सीवरात्रीस–श्री सनीध घेऊन येणे व हरीभक्त असतील त्यांस घेऊन येणे जो कोण्ही

१ ही सहा अक्षरें वेगवेगळीं आहेत. *येथून पत्राचा पाठीवरील मजकूर आहे, व तेथेंच "श्री शंकराजी नारायण" असा ती[न] ओळींचा अष्टबुरुजी शिक्का आहे.

हैगै करून राहिला म्हणजे बरा विचार नाही वाणी उदमी असतील त्यास घेऊन येणे छ २१ रजब पा। हुजूर लेखना
वधिरयं[1]
भाति
( शिका व मोर्तब वर्तुलाकारी )

( १ चारहि अक्षरें भिन्न ) *सुरुसुद

---

## २१ कान्होजी आंग्रे यांचें व्यापाराबद्दल अभय पत्र

( श्री. ब. द. आपटे )

ले. ३९ मू. दा. प. } श्री नकल { श. १६५० आश्विन वद्य ३ इ. १७२८ ऑक्टो. १०

अभयेपत्र समस्त राजकार्ये धुरधर विस्वासनिधी राजमान्ये राजश्री कान्होजी आगरे सरखेल ता। साउकार व वाणी उदमी घाट बालाघाट वगैरा सुा। तिसा आसरीन मया व अलफ कारणे अभयेपत्र दिल्हे यैसा जे वेदमूहूर्ती बापू जोसी चेउलकर याही हुजूर येऊन कसबे चेऊल येथील वसायेतीचा कौल घेतला आहे त्यास साऊकार व उदमी व वाणी कोणेविसी शक न धरीता अमदानी करणे पैसालु जकात शारात माल येईल त्यास जकात माफ केली असे... निकालू... जकात शाराऊन माल जाईल त्यास जकात दर सदे रुाये १८ प्रा। साले सात व दर सदे रुाये २८ बा। साले पाच सा। बारा साले उगवणी करून बारा वरेसानंतर सिरिस्ताप्रा। निकालु जकात येक घेतली जाईल कोण्हेविसी सक अदेशा न धरिता बेशक होऊन बदरमजकुरी येऊन उदीम वेवसाये करणे अभये असे छ १७ माहे रबिलावल+

---

## २२ मानाजी आंग्रे यांचें निवाड्याविषयीं पत्र

( श्री. ब. द. आपटे )

ले. ४० } श्री { श. १६५८ पौष वा। १३ इ. १७३७ जाने. १७

दं मो। अनाम जमीदार मामले चेऊल यांस * मानाजी आगरे सुा। सबा सलासीन मिया व अलफ अलीबागकर व चे सेरकराचे मनसुबीस आज्ञेप्रमाणे तुम्ही व समत पाटेल मोख्तसर जमा जाहले आहेत त्यास वीट माहात्रा खादलकर याची मनसुबी आहे ते तुम्ही जमीदार व सर्व मिलोन आणखीं कोन्ही ‡ पाहिजे ते तर्फे कडील मनसुबीची हकीकत चौकस मनास आणून मनसुबीचा वतन करून हुजूर हकीकत विदित करणे ताकीद जाणीजे छ २६ रमजान मोर्तब सुद

(मुद्रा:) श्री
श्री शाहु नृपति प्री
त्या ... ... ...
... कान्होजी सरखे
लस्य मुद्रा जय
ति....

---

*पा. स. १३।६२ + पा. स. १६।६२

+ लहान वाटोळा असा ओळीवर शिका आहे ‡ येथून पुढचा मजकूर अस्पष्ट फाटला आहे.

# २३ भोसले नागपूरकर यांची पोतदारी व कर्जखतें

( श्री. शं. ना. वत्स जोशी )

लें. ४१ } श्री { श. १६७७ / इ. १७५५

यादी सरकार राजश्री जानोजी भोसले सेनासाहेब सुभा सु॥ सीत खमसैन मयां अलफ राजश्री मोरो विनायक व त्रिंबकराव दीक्षित पटवर्धन यांजकडे सरकारची पोतदारी करार सागावी कलमे बिता॥

सरकारचे तालुके याची पोदारी तुम्हास करार करून दिली असे

१ जमेची पोदारी सांगोन दर सदे रुा २ दोन प्रा करार करून द्यावे पैकी येक रुा सरकारचा व यक रुा मारनिले

१ बाबूजी नाइका प्रां पोदारी चालवावी

१ बहु मान पोदारीचा पूर्वी बाबूजी नाईक जोसी यांसी पोदारी सांगोन दिला त्या प्रां द्यावा कलम येक

१ रुपये कर्ज द्यावे

५०००० तूर्त द्यावे पनास हजार

रुा ३५००० कापड १५०००

१५०००० राजश्री पतप्रधान यांजकडील काम काज जाहालियावर दीड लक्ष

५०००० कापड

तूर्त

महिन्यानें द्यावे

५००००

२५००००

यो॥ दोन लक्ष पनास हजार कलम

१ राजश्री पंतप्रधानास यैवज देणे लागेल काम काज विले लागलियावर सद-रहू तुम्हास पुरवल्यास द्यावे

बाकी द्यावी कलम येक

१ जमेचे पोदारीपैकी तुमचे जातीस दर सदे रुा १ यक करून दिल्हा त्यापैकी जातीस पाच हजाराचा सरजाम देऊ तो यांतच मजुरां घेऊ कलम येक

---

पे. २९०८

१ नगदी व कापड घेतले यांचा आखेर श्रावण पावेतो झाडा करून द्यावा आगर मामलत कमाविसी व इजारा लाऊन द्यावा याची नेमणूक सरकार सिरिस्तां प्रां करून द्यावी बाकीच्या यैवजास आखेरसाली जागा स्वदेसी लाऊन द्यावी

१ पालखीस जागा हजार रुा लाऊन द्यावा

१ देसी यैवज घेऊन तो पुणियास पोचाऊन देऊ आगर वाजवी हुडणावळ पडेल ते देऊ

१ सरकार पोदारीचे कामकाज बाबूजी नाइकाचे वेलेस चालत होते त्या प्रा सेवा घेऊ चालवावे

१ बाबूजी नाईक व आपाजी जिवाजी सीखडे वगैरे तुमचे निा आमचे कुले आसतील त्याजकडील यैवज उगऊन द्यावा

११

यो कलमे आकरा

(ये)कून कलमे आकरा कराराप्रामानें लिहिले सही

ईमाने वर्तनूक करावी

---

ले. ४२-४४ { {

श्रीलक्ष्मीकांत

( ४५०६ ) श. १६७७ युवा कार्तिक शुा। १३

जानोजी भोसले सेनासाहेब सुभा — मोरो विनायक व त्रिंबकराव दीक्षित पटवर्धन–कापड खरदी रु. १५ ह. चे घेतले. हे रुा अखेर साली देऊ छ ११ सफर × हा रोखा लिहिला सही

(४५०७) "कर्ज ३५००० पंचतीस हजार व्याज द. मा. दर सदे रुा। २ दुवोत्रा."

( ४५०८ ) सबा खमसैन मया व आलफ

तुमचे कर्जाचे हिसेबाची बाकी ताा मार्ग. शु. १ ५८५० माो, व्याज रु. १ एकोत्रा

[ हीं तिन्ही पत्रें कर्जखतें आहेत. ह्यांत श्रीकाराजवळील लक्ष्मीकांत ह्या दैवतो-लेखाचीं अक्षरें भिन्न वळणाचीं आहेत. तसेंच 'हा रोखा लिहिला सही' हे पत्र-समाप्तीचे चार शब्दहि भिन्न वळणाचे आहेत. पण हीं दोन्ही भिन्न वळणें एका-च्याच हातचीं आहेत असें दिसत नाहीं. 'लक्ष्मीकांत' हें लिहिणारा वेगळा आणि

'हा रोखा लिहिला सही' हें लिहिणारा वेगळा असावा असें वाटतें. हे कागद दीक्षित पटवर्धन पुणें संग्रहांतील आहेत. ] पा. स. ४।६७

---

ले. ४५ तु. मू. द्ा. प. } श्री नकल { श. १६७९ पौष वद्य ३० इ. १७५८ फेब्रु. ८

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री सदासीव हरी स्वामी गोसावी यासिं

पो बाळाजी बाजीराऊ प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लिहीत जाणे विशेष पुण्याचे साहुकाराचे कर्ज सरकारचे उगवणीचे च्यार लक्ष राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर यांजकडे आहे ते श्रावण शुध १३ स पावते करावे आसा करार जाहला आहे त्यास तुम्ही माघ शुध १५ पर्यंत व्याज करिता पुढे श्रावण पावेतो करीत नाही म्हणोन साहुकारानी विदित केले त्याजवरून हें (पत्र) साद (र) ×××× यैवज श्रावण सुध १३ स प ×××× ती पावतो व्याज देणे जाणीजे छ (२८ जाा़ल) (स) मान खमसैन मया व अलफ बहुत काये लिहिणें

---

# २४ उत्तर हिंदुस्थानचें बातमीपत्र

ले. ४६ पे. द. } (श्री. द. बा. डिसकळकर एम्. ए. इंदूर) श्रीगजानन { श. १६७७ इ. १७५५

सेवेसी विज्ञापना निाा गोविंद कृष्ण

येणेप्रमाणे पत्रे २

श्रीमंतास पत्र कीं

१ संवस्थान उदेपुरीहून नाथजी माहाराजा व उमेदसिंग व जसवंतसिंग व मोहकमसिंग यांसी वचनप्रमाण देऊन येथे आणिले आहेत त्यांची बोली चाली करून राज्य घ्यावयाचा सिधांत जाला आहे ते आपल्यापासी ठेविले आहेत प्रस्तुत जाटाचा मनसुबा जालियावर तोही सिध्धीस न्यावा यैसा पहिलेच करार जाला होता सांप्रत राजा प्रतापसिंग होता तोही मृत्य पावला त्यावर विशेषात्कारें निश्चयरूप हे गोष्ट करावीच लागली आमच्या व उभयता सरदाराच्या विचारें हा निश्चय जाला आहे पेंच नाहीं याजमुळे उदेपुरीहून कोणी वकील

---

* पा. स. १८।६५.

आला तरी त्याचे काही न येकता माघारा वाटे लावावया स्वामी समर्थ आहेत या राजकारणात गोविंद [1]कृष्ण येकनिष्ठ आहेत म्हणून येक पत्र

---

ले. ४७ } श्री {श. १६७८ माघ शु. १०
पे. द. } {इ. १७५७ जाने ३०

सेवेसी आज्ञाधारक महिपतराउ लक्षुमण सा। नमस्कार विनंती विज्ञापना ऐसीजे येथील वर्तमान ता। छ ९ माहे जमादिलावल जाणून असे विशेष मारवाडचे वर्तमान यथापूर्व आले माधोसिंगाने उत्तर केले की आपण येकंदर गनिमाचे फौजेवर चढाई करनार नाही तुम्ही सलूक करीत असाल तर दरमियान येऊन सुला करून देतो हे गोस्ट बिजेसिंगाचे व गजसिंगाचे मनात न आली तेव्हा पातसाहापासी जावे या विचारे निघाले माधोसिंग म्हणो लागले कीं जेव्हा तुम्ही पातसाहास बाहेर काढून आगऱ्यास आनाल ते आम्हास बोलावितील मग जे होने ते होईल पुढे काय वर्तमान येते तैसे लिहून

नबाब सलाबतजंग मौजे सांगवी परगणे लोहगाऊ गंगातिर होते छ २८ माहे राखर पावेतो रुख कलबुर्गे धरला आहे पातसाहाचे फर्मान तीन आले येक नबाब सलाबतजंग दुसरा मुसा बुसी फिरंगी तिसरा हैदरजंग त्यास नवाबही अलाहिदा फर्मानवाडी उभी करून घेऊन आले मुसा भुसी व हैदरजंग यलाहिदा जाऊन फर्मान घेऊन आले मुसा भुसीस खिताब लिहिला आहे उमदमुलमुलकस-येउदौल मुसा भुसी बाहादरगंज फरजंग सो। सालार व हैदरजंगास खिताब आसदुद्दौला जुलाफिकारखान बाचर हैदरजंग आनि उभयेतास राजश्री माहाराव जानोजी निंबालकर याणी मुसा भुसीस वस्त्रे ७ व सरपेच व जिगा जवाहिराचा व हैदरजंगास वस्त्रे ५ व सरपेच जवाहिराचा पाठविला होता दोघाही घेतले सेवेसी विदित होय

अनरुद्दीखान बमये जमीयेत व फिरंगी अरकाटेत दाखल जाले तमाम जमीदार जमा करून पैसे वकिलाचे मारफतीने घेत आहेत राजश्री शमषिर बहादर कासारबारीचा घाट उतरून खानदेश प्रातात गेले आहेत आज उद्या बुऱ्हानपुरास पोचतील बहुत काये लिहिणे हे विनंति

राजश्री दताजी सिंदे व जनकोजी सिंदे नागोराभोवते होते तैसे आहेत माधोसिंगास त्यानी लिहिले की ते तुमचे म्हटले आयकत नाहीत पातशाहापासी जात आहेत इतक्यावर आम्ही मुलक खराब करून मग तुम्ही शब ठेवाल की आमचा

पा. स. १८।६५

[1] हा राहाणारा जायगांवचा. याचे भाऊबंद म्हणून धोंडो दत्तात्रय व केशो कान्हो यांचीं नांवें सांपडतात. मल्हार कृष्ण नांवाचा आणखी एका इसमाचें नांव पत्रांतून आढळतें तो याचा भाऊ असावा.

मुलक खराब केला रोकड ते कोणीकडे दोघे जन गेले हे तहकीक वर्तमान आलदा-वर लिहून पातशाहा अद्यापि गेले नाहीत सेवेसी श्रुत होय

नवाब रुकनुदौला येथे आहेत विठल सुंदर सगमनेरकर वी वराडात अलजपूरचे कामावर होते आता त्यास म्हनत आहेत की अमिनी तुम्हास देतो तुम्ही जाऊन सन ११६५ जमाबंदी आपले रुबरू करून मागील वसूल काय जाला तो तहकीक करून कामावर खबरदार राहोन पुडे तुम्हास तेथील उमदे काम सांगू मानुले कबूल करीत नाहीं ज्याने सुभेदारीचे काम केले तो अमिनी करून जाऊन लोकात हासे करून घ्यावे उतम नाही रुकसत घेऊन पुतन्याचे लग्नास जानार आहेत पुडे काय होईल ते पाहावे शाहानवाजखानाचा व रुकनुदौलाचा स्नेह अद्यापि पुरता जाला नाही इतक्यावर काय होईल ते पाहावे शहानवाजखानाचा पुत्र अबदुल येहीखान येथे आहे अवघे लोक त्याची खुशामत करीत आहेत दरगाहकुली-खान काहीयेक दिवस शजदर होते आता इस्तकलालीने आहेत नबाब येथे आल्यावर जे होने ते होईल दिवानीचे काम कमालुदी अलीखा करीत आहेत तनखादाराची झोड आहे पैसा खजान्यात नाही आमिलावर वराता देत आहेत आमिलाचे घरी हगामा तनखादाराचा सुडीकवाडी होते ऐसे येथील वर्तमान आहे करोड्याचे अमलाचा अतिशये आहे कोन्हाचे मानीत नाही महमद मुरादखान रिकामे आहेत रुकदौलापाशी जात येत आहेत त्याचा भाऊ लस्करास गेला आहे त्यासही काही तालुका जाला नाही बहुत काय लिहिने हे विज्ञापना*

---

## २५ कच्छकाठेवाडचें बातमीपत्र

ले. ४८ (श्री. द. ब. डिसकळकर एम्. ए. इंदूर)
पे. द. श्री

श्रीमंत माहाराज राजेश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी

सेवक आज्ञाधारक भगवंत रामाजी कृतानेक करद्वय जोडून सां नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता। छ ११ माहे जमादिलाखर पावेतो साहेबाचे पुण्यप्रतापेंकरून यथास्थित असे विशेष......यानंतर या प्रांती दंगा विशेष जाला आहे जनवार्ता कीं भूजप्रांती सिंधियांनीं भारी जमावानसी प्रांत मजकुराहून पंचवीस तीस कोसावर मुकाम करून विशेष फितवा केला आहे भूजवाल्या राज्यानेही जमाव केला आहे कमालुदीखान बाबीही त्याजपासीच आहेत आझून संग्राम जाला नाही युधप्रसंग जाल्या नंतर जे होईल तें मागाहून लेहून विनंतीपत्र सो। पाठवितो खगारग्रामकर घोघा प्रगणे प्रांती गेला आहे त्याचें तथ्य काय आहे तें कांहीं कळत नाहीं त्याची खबर कळल्यानंतर विनंतीपत्री साहेबास श्रुत होईल...सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

पा. स. ९।६१

# २६ अहमदशहा अबदालीचा निजामाशीं पत्रव्यवहार*

(श्री. द. बा. डिसकळकर, एम्. ए., इंदूर)

प्रस्तुत टिपणाच्या आधारें मी अहमदशहा अबदाली आणि निजाम यांमध्यें झालेला प्रत्यक्ष पत्रव्यवहार मंडळापुढें मांडीत आहें असा समज होण्याचा संभव आहे; पण तसें नसून त्यांच्यामध्यें जो पत्रव्यवहार झाला होता त्याचे उल्लेख असलेलीं मराठी पत्रें आपणापुढें मांडीत आहें. हीं पत्रें पेशवे दप्तरांत संरक्षित आहेत. तीं निजामाच्या दरबारांतून मराठ्यांच्या निरनिराळ्या तीन चार बातमीदारांनीं पुणें दरबारला लिहिलेलीं असल्यामुळें त्यांतील माहितीविषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं.

सर्व पत्रांतला मिळून या पत्रव्यवहारासंबंधीचा मजकूर असा आहे. अबदालीनें दिल्लीच्या बादशहास गादीवर बसविलें. आलमगीर बादशहाचें फर्मान व अबदाली, खानखानान, माधवसिंग व महमद सईदखान यांचीं पत्रें निजाम सलाबतजंगाकडे आलीं. त्याचप्रमाणें बादशहाकडून मुसा बुसी व हैदरजंग यांना स्वतंत्र किताब आले. अबदाली दक्षिणेस येणार म्हणून आवई होती; पण तो दिल्लीच्या बादशाहीचा बंदोबस्त करून आपल्या देशीं पानपत, लाहोर वगैरे शहरावरून निघून गेला. त्यानें निजामाला पाठविलेल्या पत्रांत काय मजकूर लिहिला तें कळत नाहीं. निजामानें अहमदशहाला पत्रांचीं उत्तरें लिहिलीं त्यांतही काय लिहिलें तें कळत नाहीं. पेशव्यांचा आमचा करार आहे कीं बऱ्यावाईट प्रसंगीं आम्ही एक असावें असा जबाब पाठविला असावा असें निजामाच्या दरबारांतील शहानवाजखानाकडून कळतें; तरी पण खरी गोष्ट निजाम अबदालीचा उत्कर्ष इच्छितात ही असावी.

निजामाच्या दप्तरांत अबदालीचीं हीं सर्व पत्रें असलीं पाहिजेत. हीं त्यानें १७५७ च्या स्वारीच्या वेळीं लिहिलीं असलीं पाहिजेत हें दिसून येतें. त्या पत्रांतील मजकूर हल्लीं जरी आपणास माहीत नाहीं तरी तो निजामानें मराठ्यांविरुद्ध आपणास दक्षिणेंतून येऊन साहाय्य करावें किंवा दक्षिणेंतच उचल खाऊन मराठ्यांना तिकडेच गुंतवून ठेवल्यानें त्यांची बादशाहीवरील सत्ता डळमळित होईल अशा मजकुराचीं तीं पत्रें खास असलीं पाहिजेत. पूर्वी नादिरशहानें दिल्लीवर स्वारी केली त्यावेळीं त्यानें निजामाशीं पत्रव्यवहार केला होता ही गोष्ट अहमदशहाला अपरिचित नसावी. निजामासारख्या दक्षिणेंतील प्रबळ मुसलमानी सत्तेनें उठाव करून मराठ्यांविरुद्ध आपणास मदत केल्यास त्यांचें महत्व नाहींसें होईल असें अहमदशहाला वाटणें अगदीं स्वाभाविक

* पा. स. ९।६१.

आहे. या पत्रव्यवहारानें आणखी एक गोष्ट साधण्याचा अहमदशहाचा डाव असावा. दिल्लीच्या बादशहाला अंकित केला तरी आपल्याला अफगाणिस्थानांत बसून हिंदुस्थानचें साम्राज्य चालवितां येणार नाहीं हें अहमदशहाला कळून चुकलें होतें. तेव्हां आपल्याला अफगाणिस्थानचा बादशहा म्हणून सर्वांनीं मान द्यावा ही त्याची इच्छा होती. दिल्लीच्या बादशहानें त्याच्यापुढें मान नमविली असली तरी त्याची परिस्थिति दीनवाणी असून तो मराठ्यांच्या हातांतील बाहुलें होता. तेव्हां इतर सत्ताधिकाऱ्यांनीं आपल्यास मान द्यावा असा त्याचा प्रयत्न होता हें, मराठ्यांनीं पंजाबावरील आपल्या सत्तेस मान द्यावा, अशा तहाच्या अटी मांडल्या होत्या त्यावरून व पुढें पानिपत युद्धानंतर मराठे, नेपाळचा राजा यांशीं स्नेह जोडण्याची जी खटपट चालविली त्यावरून सिद्ध होतें. त्यांच्या आधीं निजामापाशीं मुसलमानी धर्मांचा म्हणून स्नेह संपादणें त्याला इष्ट वाटल्यास नवल नाहीं.

आतां निजामानें अहमदशहाशीं कसें धोरण राखलें असावें याविषयींही आपल्याला कल्पना करतां येतें. निजामाची यावेळीं म्हणजे १७५७ च्या वेळीं स्थिति निर्भयपणाची नव्हती. त्याच्या दरबारांत फ्रेंचांचें बस्तान फारच वाढलें होतें. मराठ्यांविरुद्ध उठाव करण्याची त्याची मुळींच ताकद नसल्यामुळें त्यानें अहमदशहाला मदत पाठविली नसावी व मराठ्यांनाही गोड वाटेल म्हणून सुखदुःखाच्या वेळीं आपण एक असल्याची भूमका उठवून दिली असावी.

सोबत जोडलेल्या एका पत्रावरून जयपूरचा राजा माधोसिंग याच्या मराठ्यांसंबंधींच्या धोरणाची कल्पना येते. जयपूरकरांचें मराठ्यांसंबंधींचें वैर अखेरपर्यंत चालू होतें व ते त्यांच्या शत्रूशीं संगनमत करीत; विशेषतः काबूलच्या अमीरांशीं त्यांचे शेवटपर्यंत संबंध होते ही गोष्ट प्रसिद्धच आहे.

ले. ४९ } { श. १६७९ इ. १७५७

सरकारची फौज जमा होईल जवळीकही होईल तेव्हां खुशामत करील व निजामअलीही करील तेव्हां जे सरकारच्या कामास उपयोगी ते प्रसंगानसार करावे लागेल तोवर दोहोकडील लगाम हाती असावे

बसालतजंगास व सलाबतजंगास अबदालीची पत्र आली म्हणऊन बसालतजंग सांगत होते शेवकाणे पुसले की काये लिहिले आहे बसालतजंग बोलले जे आबदाली दक्षणेस येणार खुलासा (१) हे अबदालीचा उत्कर्श इछितात कुमकेस येतील अनि

१ पत्रलेखक कोण आहे तें समजत नाहीं.

याजपासून काही काम होईल ये गोष्टीचा भरवसा [ सेवका ]स नाही माझ्या मते घोलून घोलून दोहीकडील लगाम राखून फौज सरकारची जमा होईल अनी येकास हाती धरावे येकास ठिकानी लावावे येक वरीस याजला मोकळे सोडू नये अबदालीस पत्रे बसालजंग लिहीत असतो हे पत्री अबदालीची आली हे उतरे आहेत ऐसे मजला वाटतें निजामअलीसी स्नेह फार करावा म्हणजे याजलाही वेसण घालितो तदनंतर उचित असेल ते करावे

---

२

ले. ५० } श्रीभवानी प्रा { श. १६७९ वैशाख वद्य ६ इ. १७५७ मे ९

श्रीमंत सदगुणमूर्ति साहेबाचे सो

आज्ञाधारक कृष्णाजी त्रिंबक--

गाचे मसलतीमुळे कर्ज जाहाले मुलुकगिरी करणे जरूर खजाना आसलिया यासमई दिलीसच जावे नाहलाज जाणून फौजेचे पोटासाठी इकडे येणे जाहाले आबदाली दिलीत राहिला तरी तिकडे जाणे जरूर आम्ही चालल्यास नवाबास घेणेच लागेल कागदी पत्री सिका करणे इत्यादिक गोष्टी घाबरेपणे न कराव्या आमचे सोबती आहेतही व पुढे असावे बरे वाईट येक जानावे नवाबापेक्षा आमचा मुलूक तिकडे जवळ आहे आम्ही पुढे नवाब मागे आहेत मग घाबरे का व्हावे काही फौज अथवा तोफखाना श्रीमंत दादासाहेबाकडे पाठवणे आनकूल पडले नाही असो तोंडाने कागदी पत्री तरी येकदिली सर्वत्र दिसे ते करावे श्रीकृपेनें या गोष्टीचेही जरूर नाही आबदालीस हरप्रकारे खातरख्वा श्रीमंत दादासाहेब व मल्हारबा करतीलच सारांष घाबरे होऊन चाकर न म्हणवावे म्हणोन लिहिले हा मजकूर शहानवाजखानानी ऐकोन स्वामीचे सो पत्र विस्तारे लिहिले आहे ते बजिनस हजूर पाठविले असे पाऊन आर्थ (?) आबदालीची आवई दाट ऐकून भागानगरास तीन वर्षे छ्यावणी करितात येंदा श्रीमंत पटणास गेलेत मुलूक खाली जाणून भागानगरास न जाता औरंगाबादेस अबदालीवर इजारत पडावयाकरिता छ्यावर्णास आलियाचा व आलमगीर पातशहाचा फर्मान व आबदालीचे पत्र व खानखानाचे पत्रे आली त्याचे जबाब व माधवसिंग वगैरे व महमद सईदखान बहादर यांची पत्रे आलीत त्याचे जबाब पाठविल्याचा वगैरे सर्व कलो येईल त्याचे पत्र सविस्तर घेऊन हजूर पाठविले यास्तव कितेक लिहिले अवरंगाबादेस यावयास बहुतानी मोडा घातला परंतु शहानवाजखानानी सर्वांच्या गोष्टी न ऐकून

स्वामीचा शब्द न लागावा म्हणोन अवरंगाबादेस आला पातशाहाच फर्मान व आबदालीचे खत व खानखानाचे खत याच्या नकला पाठविल्यात म्हणोन शहानवाजखानानी सो लिहिले आसे परंतु मुनषी नबाबासमागमे माघे राहिलेत यास्तव नकला पाठवणे राहिल्यात नबाब येथे दाखल जाल्यावर नकला घेऊन पाठऊन देतो तिकडून बहुतानी बहुता प्रकारे यांसी लिहिले परंतु येथून जबाब हेच गेले जे श्रीमंताचा आमचा करार आहे जे बन्याबाइदास शरीक असावे त्यास जे करणे ते त्यानी आम्ही येक होऊन करावे आम्ही श्रीमंताचे शरीक असो हे पूर्वकथा कलावी म्हणोन मात्र विनंति करणे जरूर जे शहानवाजखान अज्ञाधारक स्वामीचा असे अबदाली तरी माघारे फिरोन गेला पानिपतपरियंत गेल्याचे वर्तमान आले. पुढे कूच दरकूच लाहोरास चालला स्वामीचे पुण्यप्रतापे आरिष्ट निर्शण जाले कलले पाहिजे

---

३

ले. ५१ श्री { श. १६७९ वैशाख १७५७ मे.

श्रीमंत राजेश्री दादा स्वामीजीचे सेवेसी—

आज्ञांकित गोविंद नरसिह

येथील वर्तमान तर काल आनखी यांची जोडी उतरेकडोन आली त्यास वर्तमान जे श्रीमंत रा नानासाहेब बऱ्हानपुरास दाखल जाले मजल दर मजल पुनेस येतात म्हणऊन सांगत होते बऱ्हानपूर जोडीस सोडोन १३ दिवस रा मल्हारजी होलकर तो तिकडेच आहेत हा कालपावेतो आले नाहीत त्या मुलकातच अहेत आनि आबदायली दिलीचा पातशाहा बसऊन त्या मुलुकचा बंदोबस्त करून आपण माघारे फौजसुधा आपले देशास गेला कलल पाहिजे दिलीकडोन येथील नबाबास वस्त्रे व परवाना येणार तेथोन रवाना जाले आहेत. कडपाकनले आदिकरोन मातबर ठिकाणे आहेत त्यासी जागा जागा वस्त्रे व फरमान दिलीहून पाठविले आहेत समागमे अहेदी दाहपंधराजन व दोघे चौघ जन खोजे आहेत ते वाटणं येतात हे बातमी जोडी वर्तमान घेऊन ताबडतोब आली त्यास हेही त्यास सामोरे कोणा मातबर माणसास च्यारी मजली पाठवणार आणि त्यात आपणही येक दोन कोस माघारे जाऊन फरमानवाडी करोन घेऊन येतील तेही या आठा रोजांत येथ दाखल होतात ते अले म्हणजे तपसीलवार लेहोन पाठवितो

---

# २७ बांडे घराण्यांतील कांहीं पत्रें, याद्या, इ.

( श्री. चिं. ब. लेले, बी. ए., सं. धार. )

* सोबतचीं पत्रें धार येथील बांडे घराण्यांतील होत. कंठाजी कदम बांडे यांच्यापैकींच हें घराणें होय. मावजीकृत कैफियतींत या घराण्याचा मूळ पुरूष अमृतराव यांस घेतला आहे. हें घराणें मूळचें विजापूर दरबारचें शिलेदारीवर होतें. या घराण्याकडे वडगांव, रनाळें आदि पाटिलकी वतनें होतीं व आजही त्यांतील कांहीं त्यांच्या वंशजांकडे थोड्याफार प्रमाणांत चालू आहेत. रनाळें येथील "बुधवार पेठ" त्यांचेकडे जहागीर म्हणून होती. तसेंच प्रगणे सुलतानपूर येथील सर्व व नंदूरबार येथील अर्ध्या भागांतून अमृतरावास मोकासा वसुलीचा हक्क होता.

या घराण्याचा वंशवृक्ष खालीलप्रमाणें होय—

१ अमृतराव—२ त्रिंबकराव—सितैन मया व अलफ ११६०—सवाई अमृतराव–सलास सितैन मया व अलफ ११६३.—४ बलवंतराव—५ ( क ) भास्करराव –( द ) खंडेराव—( म ) मार्तंडराव—६ भगवंतराव—७ व्यंकटराव—८ खंडेराव.

सवाई अमृतराव हे तलवार बहादूर होते. त्यांना "सवाई" हा एक किताब पेशव्याचेकडून मिळाला. रनाळें सोडून हे प्रथम कोपरलीस आले. कोपरली व ठाणेंपाडें हीं गांवें यांनाच जहागीर म्हणून मिळालीं असें दिसतें. सवाई अमृतराव हे पानिपत युद्धांत हजर होते व हुताशनीचे दुसरे दिवशीं हे मारले गेले याबद्दल या घराण्यांत अजून कुलधर्म चालू आहे. भगवंतराव हे धार सरकारचे जामात. श्रीमंत रामचंद्रराव पवार ( इ. स. १८१०–३३ ) दुसरे यांची कन्या बाळाबाई यांना दिली होती. धार संस्थानांत यांना जहागिर व रहावयास वाडा दिला होता. या घराण्यास दक्षिणेंतील तोरखेड गांवचेंही कांहीं वतन आहे.

कोपरली येथें एक जुनी गढी आहे व कांहीं छत्र्या बांधलेल्या आहेत. उमरपाडें हें गांव सवाई अमृतरावाकडे होतें. यांचेकडे मोकासबाब वसूलीचा हक होता व स्वार ठेवून सरकारचाकरीवर ते रुजू होत असत. कदम बांडे या घराण्याकडे इ. स. १७३० चे सुमारास रु. ४८१८८८–७–० उत्पन्नाचा मुलूख होता. हें घराणें शिवाजी महाराजांच्या वेळेस विजापूरकराची नोकरी सोडून मराठी राजकारणास येऊन मिळालें व पुढें गुजराथेंतील राजकारणांत तें दाभाड्यांच्या पक्षास होतें. या काळाविषयीं बरीच माहिती पेशवे दप्तरांतून प्रसिद्ध झालेल्या भागांत मिळते.

---

* पा. स. २२।६६

ले. ५२ } १ { शक १६८१ श्रावण शु. १०
इ. १७५९ ऑगष्ट ४

श्री

राजश्री त्रिंबकराव चाडे गोसावी यांसी

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य—स्नो। बालाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद सुा। सितैन मया व अलफ खासा स्वारी बाहेर निघावयाचा विचार आहे तरी तुम्ही फौजसुद्धा हुजूर सत्वर येणे जाणिजे छ १० जिल्हेज बहुत काय लिहिणे

शिक्का लेखन
सीमा

पौ छ ८ मोहरम ( ता. १ सप्टेंबर १७५९ )

---

२

ले. ५३ } {

श्रीगजाननप्रा।

२ भाऊ गिरमाजी

दंडवत विनंती येथील क्षेम ताां वैशाख वद्य पावतो सर्व मंडळी येथास्तित असो विशेष आपण नदुरबारचें मुकामीहून गेलिया ताा. तिकडील वर्तमान कळत नाहीं तर सविस्तर ल्याहावे येथील वर्तमान कलमवार तपसील

१ काा कोन्हाळे येथील मुकामी रेवातीरी गाइकवाड याजकडून राा रावजी गरुड सरंजामसुद्धा येऊन चिरंजीव बज्याबाई यास कुंकू लाऊन बडोयास खटल्यासुद्धा घेऊन आले कलम

१ वैशाख शु।। १२ रविवारी आम्ही बडोयास येऊन दाखल जालो त्यास माडवाची वगैरे आराप उत्तम प्रकारची करून जेथील तेथे सर्व कारखान्याचा बंदोबस्त ठेऊन कोठे न्यून न पडता कारभारी याणी तरतूद ठेविली कलम

१ चिरंजीव ताां बज्याबाई याचे लग्न वद्य १ गुरुवारी जाले च्यार दिवस उछाह उत्तम प्रकारचा होऊन सर्व विधी पार पडून कार्यसिद्धी जाली चतुर्थ दिवशी ×××× विधयुक्त उभयेपक्षी रंडेरा राहून त्याचे त्याणी पार पाडून घेतले वडिलाचे व आपले आशिर्वादे सिद्धी आल्यासारखी जाली आपणास कळावे म्हणोन लिहिले आहे कलम

१ रा॥ गोविंदपंत भाऊ व रा॥ बाबाजीपंत बाबा अलकूटकरडे चार दिवस उभे राहून बहुत साहित करून पार पाडिले कलम

१ तीा॥ मातुश्री भागाबाई यांणी लिा॥ अन्वये सर्व गोष्टी पार पाडून घेतल्या चार दिवस आपले माडवात राहून जेथील तेथे वडिलपणें आपले हातून सर्व करून पार पाडिले व पुढेही बाईच्याच विच्यारे सलामसलत करीत आहोत कलम

१ आम्हाला येथें राहावयाचे नाहीं परंतु सोयरे याचे म्हणणे पडते कीं चार मास तुम्हीं राहावे आम्ही राहात नाहीं यैसे म्हणत आहोत मग रुनानबंध काये असेल तो न कळे कलम

१ का॥ रनाळे येथील ठाणे का॥दार याणी उठविले किंवा तैसेच आहे हे कळवावे येथे रा॥ गंगाधर शास्त्री वि॥ फिरंगी याजकडे आम्ही बोलणे लावीले की रनाळे ही जागा मातबर आहे याची उस्तवरी तुम्ही करून तेथील मामल्याचा बंदोबस्त तुम्हीं ठेवावा त्याचाही रुकार पडतो त्यास याचा विचार कैसा करावा तो ल्याहावा त्याप्रा॥ पुढे बोलण्याचा विचार रा॥. गोविंदपंत भाऊ व बाबाजीपंत बाबा याचे हातून करणे तैसा करू अजपरियेत चारचा भरणा होत आला आहे व पुढे पाच घेऊन याची घोडी ध्यावी यैसा विच्यार आहे मग घडता घडेल ते खरे कलम

१ पेठ मा॥री शास्त्रीबाबा याजकडून पचवीस स्वार व पनास माणुस कारकुनसुद्धां घेऊन यावे यैसा विचार आहे कलम

१ हा इत्यर्थ ठरला म्हणजे मोकासा व किले तोरखेड व का॥रनाले कुलबाब कुलकाणू दरोबस्त बेहुडा करून घ्यावा बागेर आनचे मते तोरखेड गाठून रनाले येथील व्यवहार करावा मग प्रसंगानुरूप काय होणे होईल कलम

१ येथील वेवहार मामलत प्रकर्णी होणे त्यास आमचे मते तुम्हीं येथें यावे म्हणजे समक्ष विचार करून करणे तैसा विचार करावयास येईल त्यांस (स्थलाचा) आपले येथील याचा बंदोबस्त ठेवून येण्याचे करावे कलम

१ रा॥ दामोदर लक्ष्मण याचे ठाणे किले मा॥री आहे आणी याजकडील ठाणे समागमे घेऊन यावे लागेल त्यास दुतर्फा खर्च पडून सिबंदी वाढेल यास्तव पंत मा॥रनिल्हे याजकडे जाऊन त्याचा गुंता दूर केला असल्यास त्याजकडील ठाणे न राहे ते करावे कलम

१ देवप्रतिष्ठा समई रा॥ बाबाजीपंत अलकूटकर याणी खलेल केली की उपाधे आम्ही आहोत रा॥ रामभाऊ व वेंकोबा बाबा यासी तंटा बहुत जाला देवप्रतिष्ठेस एकप्रहर गुंता झाला तेव्हां चौघानीं ईत्यर्थ ठरविला की उपाधीक समाईक ठेवावे त्यास समाईक तिन्हाईताजवळ ठेविले आहे येविशई रा॥ वेंकोबा बाबा याणी बे॥ श्रीपतराव

याजला पत्र लिा आहे हे पावते करून त्याजपासी कागपत्र मागील वहिवटीचें आहेत ते घेऊन पाठवून द्यावे × × × × × × × × × × कलम

१ सिलेदार मंडळ वगैरे कोणास रवाणा करावयाचे आहे त्यास दोनचार दिवसात रवाणा करून देवीतो कलम

१ भाऊचद याजला विचारावे कीं आम्ही जबरदस्ताकडे मामलत सांगून बंदोबस्त करू मग तुम्ही कुचेष्टा करीता याकरिता त्याचेही कानावर घालावे कलम

१ सोनगडचें मुकामीहून गाडिया रा करून दिल्या आहेत त्या पावला असतील हे ल्याहावे कलम.

१ किले माारची व सेरीची वगैरे लावणीचा बंदोबस्त आपण केलाच असेल परंतु सूचना मात्र लिहिली आहे कलम

१ दादाजी पाटील वाघालेकर याचा बेल रथास आम्ही ठेविला आहे त्यास बैलाविशी तटा पडला असेल पेशजी आपणास लिाच होते त्यास तीस पसतीस रुा परियेत देऊन त्याची खातरी करावी खेरीज च्यार बैल खरिदी करून घ्यावे म्हणोन समक्ष सांगितलेच आहे त्याप्रा आगत्य घ्यावे बैलाविशई सुस्ती न करावी.

२ आपण चिरंजीव रा आनंदराव कदम याचे स्वीसमागमे पत्र पाठविले ते पावले छ १६ रोजचे पत्र पा ते छ २६ रोज मिनहूस पावले का रनाळे येथे ठाणे कायम आहे अद्याप उठले नाहीं व मोकाशाचा जाचसाल वद प्रतिवद होत आहेत निश्चयांत अद्याप आले नाहीं मागाहून मुजरद माणसासमागमें सविस्तर वर्तमान लिहून पाठवू म्हणोन लिहिले ऐसियासी आपले येथील बेवहार तर या प्रकारचा आहे त्यास कमादार ठाणे उठवून घेत असल्यास उत्तम आहे व ऐकत असल्यास येथून उफराळा करावयास येईल यास्तव खुलासेवार वर्तमान लिहून पाठवावे कलम

१ मौजे धमावे व कम मदावे व कास व झोडवडे येथील सेर याचा बदोबस्त करून लावणी करवावी आपले तो ध्यानातच आहे परतु सूचना मात्र लिहिली आहे कलम

१ बाबाजी गंगाधर निा कादार याजकडे गहू आपले आहेत त्यांस त्याचा पैका दिल्हा आपल्यास गहू बिजा वगैरे लागतील याजकरिता माघारे घेऊन कोठीत ठेवावे उपयोगी पडतील कलम

१ चिरंजीव नारायणराव नाना नगरदेवल्याहून आले म्हणोन परस्परे वर्तमान एकिले त्यांस रा भिवराव पवार याचे घरी वधू आहे त्याचे बोलणे आले कींवा न आले हे चिरंजीव नारायणराव याजला विचारून लिहून पाठवावे कारण की येथे

एक दोन वधू आहेत बोलणीं लागली आहेत याचा विचार कैसा करावा तो ल्याहावा त्याप्रो करावयास येईल कलम

२१

येकूण कलमे एकवीस लिहिली आहेत हे मनन करून येथे मामलत समर्थी जाबसाल ठरवा पाहिजे यांचा विचार करून कोणती गोष्ट आपले सलेस येती ती लिहून पाठवावी पत्राचे उत्तर सत्वर पाठवावे बहुत काय लिहिणे हे विनंती ताजा कलम

१ पेसजी कैलासवासी वडिलाणी पेठ मारी × × रंग स्थळी अमल अनभवीला पुढे दिवस माहामे सिकानश्चा पेच पडून सरदारी सर्वोपरी हालाखीस आली सबब कोपरलीचे मुकामी भाऊबंदास हिशासंबंधी कागदपत्राची आक्षा दाखवून विचूर-करा...( अपूर्ण )

---

३

लें. ५४ श्री {श. १७३३ आषाढ वद्य ४ / इ. १८११ जुलै ९}

* पौ छ ७ माहे साबान भाद्रपद सन १२२७

दडवत विनंती येथील कुशल ता॥ छ १७ माहे रजब पावेतो मु॥ बडोदे येथे येथास्थित असो विशेष तुम्ही मल्हारी व गरबडपोरगा याजबरोबर पत्रे आशाढ वा॥ ४ मगळवारची पाठविली ती येथे श्रावण श्रु॥ ८ अष्टमीस दाखल जाली पत्रातील अभिप्राय समयिकांत आला त्याची उत्तरे कलमवार ता॥

१ रा॥ रामाजीपंत आबा व कुशाबा तात्या याजला आपल्याकडील तुरगक्षेत्राचें वर्तमान सागितले त्याणी अभय दिल्हे आहे की काहीं चिता न करावी रा॥ तात्या अनकाईस गेले आहेत रा॥ श्रीपतराव भाऊ धुळ्यास उदईक जाणार आम्ही त्याजसमागमे जाऊ म्हणोन लि॥ त्यास तुम्ही त्याची मर्जीस पाहून आहात हे उत्तमच आहे कलम

१ राजधानीणे जितके जाले तितके करून पहातो अमळनेरकर आरब या मसलतीस सिद्धच आहेत रा॥ श्रीपतराव एकवेळ रा॥ येशतवतराव भाऊ मामलेदार याजकडे सिदखेड येथे जाऊन तेथे रा॥ सदाशिव जनार्दन व निळो बाजी नि॥ × × कर हे जाबसालास आले होते त्याची व याची बोलणीं होऊन मागती श्रीपतरावजी आले म्हणोन लि॥ त्यास × × नकर किला घेऊन सिरचेस्मा होऊन बसले आहेत ते राजधानी × × × कैसे ऐकतात आपणच कानांत

---

* भाद्र. शु. ८, आगष्ट २७

तेल घालून निद्रा केली आता परम संकटांत पडलो आहोंत असो साभिपचारें जाबसाल होऊन किला हस्तगत होत असल्यास करावा नाही तरी सरसुभे याचे अनुमते आरबाची मसलत सिद्ध करून प्रयत्नास लागावे दिवसे दिवस वोझे जालियास मसलत जड आपल्यासच आहे . यद्‌र्थी मसलत होत असल्यास करावी कलम

१ रा॥ रावजी बापूजी व कृष्णाजीपंत अमळनेरास आरबाकडे गेले म्हणोन जबाणी पतोजी याणे सांगितले त्यास मसलत कैसी केली हे वरचेवर कळवीत जावी आपण आम्हास वर्तमान सत्वर कळवीत नाही त्यास हें उत्तम नाहीं वरचेवर कळ-वीत जावे कलम

१ आम्ही येथून धनसिंग व दयाराम सिपाई याज समागमें पत्रें लिहिली आहेत ते तुम्हास पावलींच असतील त्या प्रा॥ रा॥ येशवंतराव भाऊ नि॥ का॥दार व बलवंतराव बापू व सरसुभे नि॥ सरकार त्रिंवर्गानी सामील असावे यां प्रा॥ आम्हास पत्रे आली म्हणजे इकडील सरंजाम सिद्ध आहे सरंजाम घेऊन आम्ही सत्वरच येऊन पोहोंचतो इकडे पर्जन्य विशेष रात्रदिवस डोळा उघडू देत नाही त्यात नरबदा व तापी याजला पाणी विशेष इतकाच मात्र गुंता आहे येरवी सरंजामास गुंता पडावयाचा नाही कलम

१ रा॥ हरी सदाशिव याजकडे मुजरद अजुरदार करून रा॥ आनंदराव गायक-वाड व रा॥ विठ्ठलराव भाऊ दिवाण नि॥ गाइकवाड याची पत्रे घेऊन मा॥रनिले याचे वकील रा॥ बापू मैराळ पुण्यास आहेत त्याजला आपले पत्राचे पूर्वी पंत मा॥रनिले याचे पत्रांत × हून पाठविले आहे कीं कदमराव नवे सोयरे याजकडील सवस्थान रा॥ बापूजी होळकर याणी घेतले आहे त्यास रा॥. खंडोपंतबाबा व सखारामबाबा वकील नि॥ होळकर याजला पुण्यास साहेब आहेत त्याची ताकीद होवून सवस्थान याचे याजकडे यावे या प्रा॥ बापूजी होळकर याजला पत्रें घेऊन यावी म्हणोन आरब याजला पत्रें निक्षून लिहिली आहेत पुण्यास जासूद जाऊन पोहोचला असेल. येथे साहेब आहेत त्याचे पत्र घेऊन पुण्यास साहेब आहेत त्याजकडे पत्रे याभावे लिहिण्याची परवानगी जाली आहे एक दो दिवसानी हस्तगत जाले म्हणजे पा॥ देतो मग आरब येतात किंवा येत नाहीं परंतु बहुधा येतील यैसे वाटते कलम

१ ती रा॥ नानासाहेब खुशाल आहेत म्हणोन लि॥ त्यास ती॥जीस पत्रे लिहिली आहेत हे पावती करावी आम्हाकडील कृष्णा कामाठी पाठविला आहे हाच तोरखड्यास जाऊन तुळसीराम याजपासी पत्रे देऊन जाबसाल घेऊन येईल तुम्ही सोनगिरीहून रवाना करून द्यावा कलम

१ रा। जिव्यावा व सिदी व जाफर व निबाजी हरगुडे या मसलतीत आहेत म्हणोन लि॥ त्यास हे दिवस कांहीं राहणार नाहींत पाहुन घेऊ चिंता नाहीं कलम

१ सारांश पोख्त बुद्धीनेंच येखादी मसलत आरबाची सिद्ध करून सवस्थान हस्तगत होईल येसे जाले पाहिजे. तुम्ही प्रबुद्ध आहात ल्याहावे ऐसे नाहीं आपले सेवेस जी मसलत येईल ती करावी हिंमत धरावी फलदाता ईश्वर आहे कलम

१ तुमचे व राममाऊ याचे व कृशाबाचे घर लुटून रामभाऊ याचे मातुश्रीस व बायकोस धरून बारासे रु॥ खर्च केला म्हणोन यो॥ रा॥ कचोबा खुटे व कृष्णभटजी याणी कोपरलीहून पत्र पा॥ म्हणोन कळले त्यास पंत मा॥निलेयाचे मातुश्रीची वगैरे बहुत चिंता लागली आहे ती लिहिता पुरवत नाहीं त्यास सविस्तर वर्तमान लिहून पाठवावे कलम

१ वै॥ रा॥ शास्त्रीबाबा याचे कुटुम्बास देवआज्ञा जाली याजकरिता दरबारचा कारभार पंधरा दिवस बंद पडला आहे त्यांस आपल्याकडे धनसिंग समागमे त्रिवर्गांची पत्रे पाठवावी म्हणोन मा॥र लिहिला आहे त्याप्रा॥ पत्रे आली म्हणजे शास्त्रीबाबा यासी भेटून सिद्धता करावयास येईल तिकडील आच्यार कसा केला आहे तो सविस्तर ल्याहावा कलम

१ रा॥ बळवंत बापू याचे पत्र आले होते त्यास तुम्ही कोपरलीस जाऊन त्याचे व आपले विच्चारे मसलत करावयाची ती करावी कलम

१ तुमचे नावे रा॥ फत्तेसिंगराव बाबा गायकवाड याजला पत्र लिहून पाठविले होते त्याचे उत्तर घेऊन तुम्हाकडे पाठविले आहे त्यास हमेशा माणसें येत जातील त्याजबरोबर रा॥ बाबासाहेब व मासाहेब याजला पत्रे लिहित जावी × ×

१ येथे सोयरे याही खर्चाची नेमणुक रु॥ तीनसे करून दिल्ही आहे त्यास पेटीया खर्च मात्र आम्ही बहुत युक्तीने पार पाडितो अजमास पाहातानी तीनसे रु॥ याचा दरमहा चढत आहे ईश्वर कैसी लज्या ठेवील ती न कळे कलम

येकून कलमे तेरा लिहिली आहेत मनन करून उत्तर सत्वर पाठवणे कृष्णाजवळ याची बायको तेथें × × आहे तिचा समाचार घेत जावा बहुत काय लिहिणें हे विनंती

---

# २८ थोरले माधवराव पेशवे यांचीं कारभार-विषयक पत्रें*

( श्री. चिं. ग. कर्वे )

हीं चार पत्रें आहेत.

**पत्र १ लें**—यांत भवानराव प्रतिनिधि यांच्या दंग्यासंबंधीं उल्लेख आहेत. सदरहू पत्रांत बऱ्याच मोठ्या व्यक्तींचीं नांवें आहेत. पत्र इ. स. १७६७ सालांतलें दिसतें. पेशवे दप्तराच्या ३७ व्या खंडांत कर्नाटक स्वारींतील पत्रें छापलीं आहेत. मुरारराव घोरपडे पेशव्यांकडे सिरे मुक्कामीं २४–२–१७६७ या दिवशीं आहेत. आपाजीराम हा हैदरकडील वकील आहे. शेवटीं सलाबतजंगाची निजामआलीची भीमासंगमीं भेट झाली असें म्हटलें आहे. सलाबतजंगाऐवजीं त्याचा भाऊ बसालतजंग असला पाहिजे. कारण सलाबतजंग हा इ. स. १७६१ च्या सुमारास कैदेंत मारला गेला आहे. हें पत्र राजकारणीं महत्त्वाचें आहे. बहुधां हें पत्र हरि बल्लाळ फडके ( व महादजी बल्लाळ ) यांनीं धाडलेलें असावें.

**पत्र २ रें**—यांत चिंचवडच्या स्वामीचा भाऊबंद पैशासंबंधीं उपोषणें करीत आहे व माधवराव त्याची समजूत घालीत आहे. पत्रांत वसईच्या मोहिमेसाठीं चिंचवडकरांपासून दहा हजार रुपये घेतल्याचा उल्लेख आहे.

**पत्र ३ रें**—हें पत्र चलनासंबंधांत महत्त्वाचें आहे. मोहरांचा भाव व सोन्याचा भाव तसेंच त्यांचें रुपयांत रूपांतर या विषयींचे उल्लेख यांत आहेत.

**पत्र ४ थें**—सिद्धटेक व मोरेश्वर येथील अनुष्ठानासंबंधीं. माधवराव पेशवे गणेशभक्त होते.

## १

## भवानरावाचा दंगा

ले. ५५ } श्री {

विज्ञापना ता छ २४ जिलकाद पावेतो येथास्थित असे विशेष इकडलि वर्तमान तरी हैदर नाइकाचे खडणीचा गुता उरकला नाही रायेदुर्गाजवळ मु॥ आहे आपाजीराम गेले आहेत ते आले म्हणज फडशा होईल भवानराव यानी लोक तीन हजार ठेविले श्रीमंतानी दूर करावयास सांगितले दोन लक्ष रु॥ करार केले लाख दिल्हे परतु लोक दूर न करीत याजकरिता हल्ला करावया × × × × तीन प्रहर रात्रपर्यंत घोल पडला त्यानंतर भवानराव श्रीमंताचे डेऱ्यास रामचंद्र गणेश व बाबूराव हरि

* ३१ वें संमेलन

घेऊन गेले प्रातःकाली वामनराव गोविंद बुणगे रा। करून सडे भवानराव याचे गोटा-जवळ कारखान्यापुढे येऊन च्यार घटका उभे होते त्यावरून त्याजवरही हला कराव-याचा मजकूर होता त्याजकडील कारकून येऊन विनंति केली कीं पाण्यामुले आम्ही कूच करून उजवे बाजूस आलो परंतु संशये न जाये त्याजवरून चितो विठल बाज्याबा पा। संशये न धरणे हे बोलणे जाले मध्यस्त मुरारजी घोरपडे पडून वामन-रावास आणून समजावीस केली प्रस्तुत उजवे बाजूस मुरारजी जवलच राहावेंसें जाले श्रीमंतांनी रुपा केली मनांत वाकडे आणिले नाहीं आसे करणे थोराचे नसावे प्रस्तुत भवानराव यानी लोकास निरोप दिल्हा निशाण बाबूराव हरि याजकडे पाठविले तोफखान्यात उतरले आहेत काल श्रीमंत डेऱ्यास आले समजावीस करतील वडिलास कलावे लग्नतिथीचा मजकूर लिा। त्यास आम्ही लांबत जातो येणे कसें होईल हे न कले कामाची अडचण श्रीमंतानी बोलाऊ पाठविले आहे मोगलाचा मुलूख सला जाला आसतात लुटतात हा बोभाट आला आहे सलाबतजंगाची निजाम आलीची भेट जाली रुष्णेवर भीमासंगमी आहे हे विज्ञाप्ति.

---

## २
## चिंचवडचा तंटा

ले. ५६ } श्री {

श्रीमत् माहाराज श्रीउमापतिदेव स्वामीचे सेवेसी

चरणरज माधवराव बलाल प्रधान रुतानेक नमस्कार विज्ञापना येथलि कुशल स्वामीचे आसीर्वादे करून येथास्थित असे विशेष आपण श्री याचे घरीं बैसोन उपोषणे करिता याचे तात्पर्य वसईच्या मोहिमेस पूर्वी दाहा हजार रुपये बापूजी श्रीपत याच्या विद्यमाने श्री पासून कर्ज घेतले खत दिल्हे परंतु तेच समई सागितले श्री नी आपल्या गावावरती पटी घालून रुपये उगऊन ध्यावे ते खत श्री पासी होतें खत श्री पासी मागितले ते समई श्री नी श्रीभुन्याबास विचारून सरका-रात दिल्हे त्याचें विभागाविसी स्वामी श्री चे घरी बैसोन उपोषणे करितात म्हणोन कलले त्याजवरून स्वामीस येथे यावयाविसी लिहिले असतां आपण न आलें उपोषणेच करून कजिया करितात ऐशास दाहा हजाराचें खत सरकारात घेतले ते समई काही गुता राहिला नाही गुदस्ता स्वारीस जाता श्रीमोरेश्वरच्या मुकामी राजश्री नारो आपाजी यांचे विद्यमानें ठहराव जाला कीं दाहाजाराचें खत सरकारात घेतले त्याचा कलह श्री सी करू नये भाऊपणाचा काही कलह असिला तर स्वारी आल्यावर पुण्यास यावें बोलावें तूर्त चालते तैसे चालावे यैसा करार जाला तो नारो आपाजी यानी सागितलाच असेल यैसे असोन स्वामी श्री चे घरी बैसोन उपोषणे करून कलह करितात यांचा अर्थ काये पत्र व कारकून पाठविली असता स्वामी

येथे न येत हे उचीत कीं काये अतःपर श्री चे घरी बैसोन उपोषणे न करावी कलह न करावा येथे येऊन बधुत्वाचे विभागाचे बोलणे असेल ते बोलावे येविसी होणे ते वाजवीच पूर्ववत् चाली प्रो होईल असे असोन केवल निग्रहच आपण करितील तर हे गोष्टी उगीच × × × × पडणार नाहीं* हे विनंती.

---

## ३

## मोहरेचा भाव

ले. ५७ } श्री {

राजश्री केदारजी सिंदे व माहादजी सिंदे गोसावी यासी

छ सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रों माधवराव बलाल प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जाणें विशेष राजश्री खंडो गोमाजी व भिकाजी सिंदे याच्या नीलबंदीच्या येवजाचा वराता तुम्हां-वरी दिल्या त्या येवजी तुम्ही मारनिलेस चौदा रुपयाच्या मोहरा सोला रुपयास देतां व सोने साडेसत्रीं घ्या म्हणतां म्हणून विदित जाहांले येसीयास पहिला तुम्ही निमे रुपये व निमेच्या मोहरा द्यावयाचा करार केला असतां हाली साऱ्याच येवजाच्या मोहरा व सोने देतां त्यास मोहरेस अधेली रुपयाचा फेर असल्यास असो केवल दोन रुपयाचे अंतर म्हटल्यास ठीक कसें पडेल यास्तव हे पत्र लिहिलें आहे तरी पेशजीच्या कराराप्रों निमे येवजाच्या मोहरा व निमेचे रुपये देणें फिरोन बोभाट येऊ न देणे रा छ ९ रमजान सुा आर्बा सितैन मया व अलफ* बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद

~ श्री ०
राजाराम नरप
ती हर्षनिधान माध
वराव बल्लाळ मु
ख्य प्रधान +

लेखन
सीमा

---

* अक्षर निराळें. + न उलटा

४

अनुष्ठान

ले. ५८ } श्री नकल {

चिरंजीव राजमान्य राजश्री माहादाजी निलकंठ यांसी माधवराव बलाल प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष सिध्धटेक व मोरेश्वर येथें अनुष्टान करावयाचे आहे त्यास श्री देव व ब्राह्मण ——— आ।

२ श्रीदेव
 १ श्रीमोरेश्वर
 १ श्री गणपति सिध्धटेक
 —
 २
६ ब्राह्मण
 ३ सिध्धटेकास
 २ अनुष्टानाचे ब्राह्मण त्याणी प्रदक्षणा २१०० येकवीससे घालाव्या दररोज संख्या दर आसामीने येकवीस प्रदक्षणा कराव्या येकूण दोन आसा ××××××

(अपूर्ण)–तुळशीबाग दप्तर

---

# २९ बाणांची बांधणी

(श्री. चिं. ग. कर्वे)

*तुळशीबाग दप्तरांतीळ खालील पत्रांत बाण तयार कसे करीत याबद्दल माहिती मिळते

ले. ५९ } श्री {

वडिलांचे सेवेसी सां नमस्कार विज्ञापना पत्र पाठविले तें पावलें

बाणाचें बंद बाधावयाकरितां कातडी व बंद बांधणार पाठवितों बाण नीट करवणें म्हणोन लिा त्यास कातडी व कारेगार पाठऊन द्यावा बाण नीट करवितोंच परंतु नवें बाण सेंदोनसें जे सोयसे पडतील ते जरूर पाठवावे का।
१

पेशजी बाणदार होते ते बाद घातले किंवा कसें केले ते समजलें नाही म्हणोन लिा त्यास च्यार बाणदार होते त्यापैकीं दोन आसांमी बाद पडले बाकी दोन आसामी हालीं आहेत आणखी नवे दोन तीन आसामी ठेऊन पाठवावे—कलम
१

---

*पा. स. ११६६

येणे म्हो दोन कलमाचे उत्तर पाठवावे शेवेसी श्रुत होय हे विज्ञापन ।

---

## ३० धुळप–इंग्रज लढाई

( श्री. चिं ग. कर्वे )

†धुळपाचें मूळ घराणें जावळीच्या मोऱ्यांचें. विजापूरच्या नोकरींत समशेर गाजविल्यामुळें धुळप आडनांव पडलें. १७६४ त मराठ्यांचें आरमार आनंदराव धुळपाच्या ताब्यांत आलें. १७९४ पर्यंत त्याच्याकडे होते. ही लढाई इंग्रज–मराठे युद्धांतील दिसते. हें पत्र तुळशीबाग दप्तरांतील आहे.

ले. ६० } श्री {

राजश्री जनार्दनपंत दादा गोसावी यांसी

छ सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] स्नों आनंदराव धुळप मुकाम जंजिरे विजयदुर्ग रामराम विनंति येथील कुशल ता। छ २१ रविलावल जाणून स्वकीये लेखन करीत असलें पाहिजे विशेष येकौली तीन डंग्या पाडाव करून आणिल्या त्यावर मागतीं अरमार सुधा छ २२ सफरीं बाहीरनाट वीस जांबापावेतो स्वारीस गेलों तों बंगाली इंग्रजी तरांडे बंगालाहून माल भरून वाटेस दोन तीन बंदरें करून सुरतेस जात होते त्यांची गांठ पडली तेव्हां अरमारचा येक जडाव करून तरांडे बाजूबाज राखोन लढाई देऊन आडावणी केली धण्याच्या प्रतापें तरांडे पाडाव जाहालें फते होऊन तरांडे सुधा छ २० रावलीं जंजीरे मजकुरी येऊन दाखल जाहालों पुन्हां अरमारची स्वारी रवाना केली आहे पाडावी तरांडेयावर मालियत बंगाली हराजिनसी कापड व कचें रेसीम व साकर सुपारी हस्तीदंत हे जिनस भरीत आहेत उतरणी करितों सदरहू तरांड्यावरी इंग्रज कपितान बायको मूल सुधा सांपडला आहे आपल्यास कळावें बहुत काय लिंहिणें कृपा लोभ करावा* हे विंनंती.

---

## ३१ घोटवडे येथील खुर्द्याची टांकसाळ.

( श्री. चिं. ग. कर्वे )

¶ पुढील दोन पत्रें तुळशीबागवाले दप्तरांतील आहेत. पहिले पत्र खर्डा असून दुसरें पत्र पक्कें सनद वजा दिसतें.

---

† ३२ वें संमेलन. *अक्षर वेगळें ¶ पा. स. ५।६५

१

ले. ६१ } श्री {

याद मौजे घोटवडे येथे नूतन कारखाना खुर्दाची टाकसाल घालावी विा याजकडे सागितली त्याची कलमे बीतपसील येणेप्रो

पैसा दुदाडी वजन पुरा चिचवडी पडतो त्याप्रो ढबू आलमगिरी सिवराई पाडावा कलम १

प्रभुवर्याकडून हरयेकविसी उपद्रव जाल्यास त्याचे निवारण आपण करू तुम्हास उपद्रव लागू देणार नाही कलम १

कारखान्यांत कारेगारापासून लबाडी जाल्यास चवकसी कानावर घालून करावी पारपत्ये करणे ते आपले विचारे करावे कलम १

हासील चिचवडी टाकसालचे सिरस्ता दरमणी रुा आरधा घेतात त्याप्रो घेत जावा कलम १

दरोगा नेमून द्यावा त्याचे विा सिका लाऊन चिठी दररोज दखलगिरीस देत जावी त्याचे वेतन नेमून द्याल त्याची चिठी देत जावी त्याप्रो देत जाऊ कलम १

दर माहे

विजया दशमीची वस्त्रे तिवटे सुमारे ५ दरसाल देत जावी कलम १

सदरहू प्रो कलमे पांच लिा प्रो निभावणी सरकारातून होईल जास्ती उपद्रव हरयेकविसी लागणार नाहीं सुखरूप कारखान्याची आमदानी करणे

जागा आम्हास कारखान्यास सरकारची द्यावी त्याचे कांहीं नाही

आम्हाकडील बोलणे हरयेकविसीचे पडेल ते येकाचे हातून घ्यावे.

पुणियाचे जकातदारास सरकारची ताकीद हासील घेऊ नये म्हणोन पानसुपारी देणे ती आम्ही देऊ

नावाडे यास नदी उताराची परवानगी येकदर असावी पानसुपारी देणे ते आम्ही देऊ

जकात थल भरीत वगैरे याचे माफ करावे

पुणियातून ताबे आणावयाची मोकलीक करून द्यावी सरकारची ताकीद करून द्यावी

वाटेचे रखवालीस रामोसी सरकारचा नमून द्यावा त्याचा रोजमरा आम्ही देऊ

कारागिराचे नावे सनद सरकारची काढून द्यावी सनदेस नाव आम्ही सागो ते लिहिवावे

२ शा. १७२६ श्रावण शुद्ध ११
ले. ६२ श्री इ. १८०४ ऑगस्ट १७

यादी टाकसाल खुर्दा कारखाना मौजे घोटवडे येथे नवीन घातला त्याचे कराराची कलमे विा गोपालपंत जोशी व रामाजी गणेश व रावोजी सिंपी सुपेकर व बालशेट रासीनकर सुा खमस मयातैन व अलफ शके १७२६ रक्ताक्षीनाम संवछरे श्रावण शुा ११ सोमवार

१ पैसा दुदाडी वजन पुरा चिंचवडी पडतो त्याप्रो ढबू सिवराई व अलमगिरी पाडावा कलम

१ सरकारांतून पेठ मजकुरीं श्रीमंताकडील टाकसाल घातली त्याजविसी उपद्रव लागल्यास निवारणी होईल

१ दरोगा प्यादा नेमून द्यावा त्याचे विद्यमाने सिका लावून चिठी वजनाची दाखल्यास कारखान्यांतून घ्यावी त्याचा मुशाहिरा दरमाहा रुा प्रो घ्यावा

१ कारखान्यांत कारेगार याजपासून लबाडी जाहाल्यास चौकसी करून पारपत्य करावे

१ विजयादशमीची वस्त्रे कारखानदार यास ५ द्यावी

१ सरकारांत पांचवा वाटा नफ्यातोट्याने ठेविला आहे नफा जाहल्यास सरकारांत घ्यावा तोटा आल्यास द्यावा कलम

६

# ३२ दस्तकें

(श्री. चिं. ग. कर्वे)

*दस्तक म्हणजे परवानगी, जकात माफीचा परवाना अशीं दस्तकें पेशवाईत निरनिराळ्या कारणांकरितां कशीं दिलीं जात हें पुढील कांहीं कागदांवरून दिसेल. हे तुळशीबागकर दफ्तरांतील आहेत.

१

ले. ६३ (१-११)

श्री

यादी नागो शामराव चिकोडीकर सुा इहिदे तिसेन मया व आलफ पुणेहून सकलाद तागे ४ व जीन सुमार १० व तटू व बैल व माणुसे आा ६ येणेप्रो

* न. पा. स. २१६५

चिकोडीस रवाना केली आहेत त्यास नदीनाले व जकातीविसी दस्तक पाहिजे येविसी परवानगी

२

श्री

यादी बाजी विश्वनाथ नि।। × × रकार दि।। भास्करराव जगना × × सु।। इहिदे तिसैन मया व अलफ़ मा।रनिल्हे पुणियाहून लश्करात जात आहेत समागमें घोडी व माणसे वगैरे आहेत × × मार्गी कोणेविसी मुजाही [म नं] होता ज्या गावी वस्तीस [रा] हातील तेथे चौकी पाहारा × × [न]दीनाले पार करून देणे × × कून दस्तक १

३

श्री

विनंती विशेष विपलोजी भिलारा मराटा गारडी दि।। रामजी वणजारे आजारी घरी जातो त्यास बेगारी च्यार आसामीचे दस्तक द्यावे हे विनंती

४

श्री

विनंती उपरी का।। धाधरफळ येथे कामगारीस जासूद जातो त्यास रहदारी नदी-नाल्याविसी दस्तक पुणे सुभाकडील द्यावे हे विनंती

[ मार्गे ] साखराजी

सु।। इहिदे तिसैन छ २७ जिलकाद

५

श्री

यादी धोडसेट वीरकर यांचें × × × × × × पधरा राजश्री परश × × × याचे लश्करात × × × जात आहेत त्यास दस्तक × × × द्यावयाची आज्ञा करावी × × दोन बैल जिनस भरून नेतात × × व तेरा रिकामे येत पधराचे दस्तक देणे

× × × इहिदे

६

श्री

यादी वेंकाजी बांबूराव कारकून नि॥ रा॰ बाळाजी गोविंद हे पुणियाहून पो॰ सिगर येथे जातात त्यास मार्गीचे दस्तक१ *रहदारीचे दस्तक देणे

[ मार्गे ] छ १४ राखर इहिदे

७

श्री

यादी आबाजी माहादेव कारकून नि॥ राघो विश्वनाथ सु॥ इहिदे तिसैन मया व आलफ हे परगणे जंबूसर प्रा॥ गुजराथ येथे लोक चाकरीस आहेत तेथे जातात समागमे घोडी रास दोन व माणसे दाहा आहेत त्यास × × × × चे दस्तक आसावे

राघो विस्वनाथ गडवाल भगवंत रुष्ण याजकडील कारकून छ ४ जिलकाद सु॥ इहिदे तिसैन

८

श्री

× × × × × × × पुण्याहून मौजे कारकीनगाव पा॥ पैठण येथे जात आहेत समागमे घोडी रास २ य माणसे आसामी ५ पाच आहेत सबब रहदारीचे दस्तक येक द्यावयाची आज्ञा जाली पाहिजे सु॥ इहिदे तिसैन सुमारी १

* रहदारीचे दस्तक देणे

छ २७ जिलकाद इहिदे

९

श्री

यादी दिनकर सिवजी सोवनी याची कुलचीण कस १ पुण्याहून तालुके रत्नागिरी मौजे सोमेश्वर येथे कोकणात घरी पाठविणार याजकरिता जकातीविसी व रहदारीविसी दस्तक द्यावया।विसी आ × × ×

* निराळें अक्षर.

१०

श्री

यादी मानाजी नाईक पाथरवट चाकर निा सरकार याची मुलेंमाणसें पुण्याहून श्रीतुलजापुरास यात्रेस जातात त्यास बरोबर ओझ्याचे बैल सर २ दोन व माणसे आहेत त्यास मार्गी जकातीचा वगैरे अडथला न करणें व जे गांवी वस्तीस राहातील तेथें गावांत जागा देऊन चौकीपहारा करीत जाणें म्हणोन सुा आर्बा समानीन मया व अलफ दस्तक

रहदारीचे दस्तक येक द्यावे छ ८ सफर आर्बा

११

श्री

यादी राजश्री गोविंदराव भगवंत पिंगले याचे उंट नफर २ दोन पुणियाहून करमल तालुकियात जातात त्यास वाटेनी नदीनाले पार करून देण्याविशी कोरेगांव येथील नावाडी यास दस्तक द्यावयाची आज्ञा जाली पाहिजे

---

# ३३ खुश्रूसेट मोदी याचा अमल

( श्री. चिं. ग. कर्वे )

*चिंचवडचे मोरया गोसावी यांचें हें पत्र मोदीस आहे. मोदीस कोणता अधिकार होता तें कळत नाहीं. हें पत्र चिंचवड दफ्तरापैकीं आहे.

श्री

ले. ६४ } {

राजश्री खुरषदजी सेट मोदी यासी

श्री चे आज्ञेनें येथील वर्तमान आषाढ वद्युल सव ××× पर्यंत येथास्थित असे स्वकीये वृत × × × करीत असावे यानंतर चिरंजीव बज्याबा याचे चुलत बंधु चिरंजीव श्रीपती हे विभक्त होऊन वेगले जाऊन राहिले वडिलांचे वेलेचे सावकाराचे

---

* पा. स. ७६५

देणें आहे त्याचे वसुलास गावचे उत्पन्न सहश्री रुा सावकाराचे खटल्याबा तहकूब ठेविले आहेत सावकाराचा तंटा पडला आहे तोडून मग यैवज राहील तो हिसेरसीप्रा घेणे दरम्यान गावास उपसर्ग न करणे याप्रा ताकीद निक्षुण व्हावी

---

## ३४ मामलतीबद्दल लांच

(श्री. चिं. ग. कर्वे)

*पुढील पत्र आनंदराव काशी यांचें आहे. हा पुण्याचा कोतवाल होता. पत्रावर सन वगैरे नाहीं.

ले. ६५ } श्रीमार्तंड प्रा {

सेवेसी आनंदराव कासी सां नमस्कार विज्ञापना येसी जे श्रीमंत राजश्री दादा-साहेबांस रुा ५०० पांचसे व तुम्हांस येक शालजोडी रुा ५० पनासाची घेऊन आमची मामलेत आम्हाकडे ठराऊन द्यावी आणि परस्तर सालचे यैवजीं आखेरी मृग साली रुा दाहा हाजार करार करावे आणि उभयेताचा यैवज रोख दतो परंतु काम जाऊ न द्यावे कराडची याद दिल्ही आहे ती दादापासी देऊन श्रीमंतास पुसोन घ्यावें आणि आम्हांस अभयेपत्र पाठवावे म्हणजे चितास स्वस्तता होईल हे विज्ञापना

---

## ३५ आंग्रे याजकडील पत्र

(श्री. ब. द. आपटे)

ले. ६६ } श्री { श. १६५८ भाद्र. शु. २
इ. १७३६ आगस्ट २७

नकल बाा असल

† वेदशास्त्रसंपन राजश्री पंडीत व धर्माधिकारी व पौराणिक व ज्योतिषी व उपाध्ये व समस्त ब्राह्मण अष्टागर व रेवदंडे प्रा चेऊल स्वामींचे सेवेसी छ सेवक बाजीराऊ बलाल प्रधान साा नमस्कार विनंती सुाा सबा सलासीन मया अलफ पाताणे परभू

* पा. स. ११६५. † पा. स. १६।६२.

चेऊल रेवदंडे व मुंबई प्रांते राहातात त्याचे जो परंपरेनें शूद्र व संकर जाती आदी करून नीच्यासी शरीरसमध सकलही शुद्रवत [ अच्यार ] चालत होता येैसे असता साप्रत तीसी ...... शामधे कितेक ब्राह्मणांही द्रव्यलोभास्तव वेदोक्तकर्म चोरून पाताणे परभूचे जो आचरत आहेत गतवर्षी राजश्री विश्वनाथ जोसी राईरकर हे मुंबईस जाऊन ते क्षत्री म्हणोन शास्त्रार्थ पत्र त्यास करून दिल्हे येैसे विदीत होऊन श्रावणमासी येथे प्रसंग पडला त्यास श्री वाराणसी व पैठण व श्रिंगेरी सस्थान कर्नाटक आदी करून स्थलोस्थलचे पंडीत आले होते त्याचा समाज करून राजश्री विस्वनाथ जोसी राईरकर यास बोलाऊन याचा विचार मनास आणिता पाताणे परभू क्षेत्री नव्हेत केवल संकर ज्यात येैसा सकल निबधवरून निर्वाद पंडिताचे विचारें सिध्धात जाहाला रा। विस्वनाथ जोसी राईरकर याणी शास्त्रार्थपत्र करून दिल्हे ते पुर्त्ता शोध करून दिल्हे नाही पाताणे परभू क्षत्री नव्हेत वेदोक्तकर्मी अधिकार नाही येैसे तुम्हा सर्व ब्राह्मणाचे नावे रा। विस्वनाथ जोसी याणी पत्र लेहून दिल्हे आहे ते तुम्हाकडेस पाठविले असे त्याचे घरी ज्या ब्राह्मणानी चोरून वेदोक्त कर्म ......तील व राजगुरू अधी करून जे ब्राह्मण आढलले त्यापासून द्रव्यद्वारा दंड घेऊन प्रायश्चीत करविले उरले ब्राह्मण ते प्राती असतील व तरीपार असतील त्याणी आलीकडे येऊन सर्वांनी प्रायश्चीत घेऊन शुध व्हावे तावत्काल ज्ञातिबाह्य अपाक्त असेत येतद्विशई सकल पंडिताही तुम्हास पत्र लि।। असे साराश जो कोणी त्याचेथे वेदोक्त कर्म आचरील तो अपक्त होऊन दंडिला जाईल हा अर्थ दृढतर चितात आणून परंपरागत शूद्रवत कर्म त्याचे घरी आचरत आला असा त्याप्रा। आचरावे रा। छ १ जमादिलोवल बहुत काये लिहिणे हे विनंती

---

## ३७ वडवाथरचें बनेश्वर मंदिर

( श्री. शं. ना. जोशी वत्स )

ले ६६० } श्री { श. १६६२ श्रावण व. ४
इ. १७४० जुलै ३१ }

*मा। अनाम देशमूख व देशपांडे ता। गौडखोरे यासिं

० श्री ०
राजा शाहू नरप
ति हर्ष नीधान बा-
ळाजी बाजीराव
मुख्य प्रधा
० न ०

ई बालाजी बाजीराव प्रधान सु।। इहिदे आर्बैन मया अलफ श्री——मौजे वडवाथर ता। मजकूर याचे देवालये मोडले होते ते राजश्री जिवाजी खंडेराव चिटनसि संनिध राजश्री स्वामी यानी बांधिले तेथील पूजानैवेद्यास इनाम जमीन पाच बिघे देवावी म्हणून मा।रनिलेनी विनंति केली त्याजवरून श्री—स मौजे मजकूरपैकी पड जमीन बिघे ०५ पांच

---

*पा. स. १०।४९.

स्वराज्य व मोगलाई कुल बाब कुल कानू हाली पटी व पेस्तर पटी खेरीज हकदार व इनामदार इनाम करून दिल्ही असे तरी देवलापुढें जमीन पडली असेल त्यापैकी सदरहू पाच बिघे जमीन श्रीकडे नेमून देणें या पत्राची प्रत लेहून घेऊन असल पत्र भागवटियास परतोन देणे जाणिजे छ १७ जमादिलावल पा। हुजूर लेखन सीमा

बार

---

## ३७ पेशव्यांकडील दोन स्त्रियांची हरेश्वर यात्रा

( श्री. ग. रा. वाळिंबे )

*कोंकणांत पेशव्यांचें कुलदैवत हरेश्वर हें जंजिऱ्याच्या सिद्दीच्या राज्यांत आहे. ह्या हरेश्वराची यात्रा पेशव्यांकडील मंडळी करीत असत, हें सोबत दोन कागदांच्या नकला दिल्या आहेत त्यावरूनही दिसून येण्यासारखें आहे. पुणें येथील सरकारी पेशवे दप्तरांतील कागद तपासण्याची जी संधि मिळाली तींत हे दोन कागद सांपडलेले आहेत. ह्या कागदांच्या नकलांवरून सिद्दी हे मुसलमान असले तरी सामाजिक बाबतींत पेशवे आणि सिद्दी यांचे आलेले संबंध आदराचे आणि समतेचे दिसतात. ह्यांतील काळ श्री शंकरराव जोशी व श्री. खरे यांच्या मदतीनें निश्चित केले आहेत.

### १ सौ. पार्वतीबाई ( भाऊसाहेबांच्या पत्नी ) यांची हरेश्वर यात्रा

सौ. पार्वतीबाई हरेश्वरास आश्विन वा। २ शके १६८८ (१९ आक्टोबर १७६६) पासून कार्तिक वा। ९ शके १६८८ ( २६ नोवेंबर १७६६ ) पर्यंत म्हणजे सव्वा महिना होत्या. त्या मुक्कामांत सिद्दीकडील मेजवानीचे जिन्नस आले आणि आणणाऱ्या लोकांना तिवटे आणि रोख रुपये बक्षीस दिले त्याचा ह्या कागदांत उल्लेख आहे. हा मेजवानीचा व सन्मानाचा दिवस कार्तिक वा। ३ शके १६८८ ( ता. २०–११–१७६६ ) म्हणजे हरेश्वराहून निघण्यापूर्वी ६ दिवसांचा आहे.

### २ सौ. रमाबाई ( थोरल्या माधवरावांच्या पत्नी ) ह्यांची हरेश्वर यात्रा

चैत्र शुा। १ शके १६९४ ( ता. ४ एप्रिल १७७२ ) रोजीं म्हणजे पाडव्याच्या सुमुहूर्ताच्या दिवशीं ह्या हरेश्वरास गेल्या आहेत. थोरले माधवराव आजारी असल्यानें ह्या कुलदेवतेस गेल्या असाव्या असें दिसतें. कारण त्यावेळीं माधवराव

*पा. स. १२।६५

आजारी होते. त्यानंतर सुमारें ८ महिन्यांनीं म्हणजे कार्तिक वा॥ ८ शके १६९४ ( १८–११–१७७२ ) रोजीं ते वारले आहेत.

ह्या हरेश्वराच्या यात्रेची तयारी अगोदर दोन तीन महिने चालली होती, असें दिसतें. पौष वा॥ ४ शके १६९३ ( २४–१–१७७२ ) रोजीं सिद्दीकडे पेशव्यांनीं वस्त्रें पाठविल्याचा उल्लेख ह्या कागदांत आहे. त्यावेळीं जंजिऱ्यास सिद्दी याकूबखान होता. त्याचा आणि पेशव्यांचा तह नुकताच म्हणजे २ सप्टेंबर १७७१ ला झाला होता. त्यामुळें दोन्ही राज्यांतील सख्य वाढलें होतें. ह्या सिद्दी याकूबनें रमाबाईकडे वस्त्रें पाठविल्याचा आणि हीं वस्त्रें घेऊन येणाऱ्या इसमांचा सन्मान केल्याचा उल्लेख ह्याच कागदांत आहे. ह्या दोन्ही कागदांचा विशेष हा कीं, आतापर्यंतच्या संशोधनांत ह्या दोन्ही प्रसिद्ध स्त्रियांच्या यात्रेचा हा भाग आलेला नाहीं.

सिद्दी हे मुसलमान असले तरी त्यांनीं हरेश्वर देवस्थानला इनाम जमिनी देऊन तेथील व्यवस्था चांगली ठेविली आहे. तेथें भूतपिशाच्च बाधा झालेले लोक आतांप्रमाणें पूर्वींही जात असत. त्या बाधेपासून तेथें मुक्तता होते अशी भाविकांची समजूत आहे. संकटकाळीं कुलदेवतेच्या दर्शनास पुष्कळ लोक जातात.

पेशव्यांकडील ह्या दोन्ही स्त्रिया त्यांच्यावर जें संकटाचें आवरण पडलें होतें त्याच्या निवारणार्थ हरेश्वरयात्रेस गेल्या असाव्यात हें अनुमान ह्या नोंदीवरून निघूं शकेल. नोंदी अशा—

१

सुरू सबा सितेन छ १८ रमजान वि॥ सौ पार्वतीबाई स्वारी कोंकण इ॥ छ १४ जमादिलावल ता॥ छ २३ जमादिलाखर रु. ८५ छ १७ जमादिलाखर मशारनिल्हेकडील लोक मेजवानीचा जिन्नस घेऊन हरेश्वर मुक्कामीं आले होते. त्यास निरोप समई तिवटें दिलीं बाकी असामी राहिल्या त्यास तिवटाचे ऐवजी नक्त रुपये दिले १६ दर ३ गुजारत चिंतो विश्वनाथ

२

राजमंडल

सु॥ इसने ( सबैन )

स्वारी राजश्री पंतप्रधान

खर्च खा॥ मु॥ परदरबार शामल जंजिरेकर जामदारखाना पो॥

१०

छ ३० जिल्हेज वि॥ सौ॥ रमाबाई स्वारा हरेश्वरास गेली ते समई वस्त्रें पाठविलीं छ १८ माहे सवाल

खा॥ आंख.

| | | | |
|---|---|---|---|
| ५८९॥ | खासा | सिद्दी जगरुदी जंजिऱ्याहून वस्त्रें घेऊन आला होता त्यास व भले लोक समागमे होते त्यास वस्त्रें | |
| ३०० | मंदील | | |
| १०४॥ | जाफरखानी १ | | |
| ८० | महंमुदी धुवट १ बुटेदार | | |
| | | १४२ | खासा |
| | | ४०॥ | सैद दरवेसाचा भाऊ |
| | | २२। | सेख सिलेमान |
| | | २०। | साहेब गलबताचा सरदार |

---

# ३९ जंजिरा आणि सचीन

## ( श्री. शं. ना. जोशी व श्री. ग. रा. वाळिंबे )

*प्रस्तुतची यादी इ. स. १८४४ सालची आहे. त्यावेळीं पेशवे दप्तर नानावाड्यांत असून तेथील अधिकाऱ्यांना त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून या यादींत कांहीं माहिती विचारली आहे.

ह्या यादीवरून जंजिरा संस्थान आपल्या ताब्यांत घेण्याच्या पेशव्यांच्या एका प्रयत्नावर प्रकाश पडत आहे. सिद्दी याकूबखान ऊर्फ बाळूमिया यांना नवीन सचिन संस्थान द्यावयाचें आणि त्याच्या बदला कोकणांतील पेशव्यांची जन्मभूमि व पवित्र स्थळें असलेलें जंजिरा संस्थान आपल्या ताब्यांत घ्यावयाचें असा हा प्रयत्न होता; पण वस्तुस्थिति मात्र अगदीं उलटच घडून आलेली दिसते. जंजिरा मिळालें नाहींच उलट मूळचें ७५ हजारांचें नवें मुसलमानी सचीन संस्थान मात्र इंग्रजांच्या कारवाईला सिद्धी मिळाल्यामुळें उत्पन्न झालें ! हें कसें झालें ह्याचीं कारणें तद्विषयक एखाद्या निबंधांत सर्व उपलब्ध झालेले कागद पुढें मांडून होतील त्यावेळीं पाहणें योग्य होईल.

---

* पा. स. १३।६५

प्रस्तुत यादींत म्हटलेला पेशवे व सिद्दी बाळूमिया ह्यांच्यांत झालेला मूळचा करार उपलब्ध झाला पाहिजे. पेशवे दप्तरांतील कागदपत्रांत त्याचा शोध लागला नाहीं. तेव्हां यादींत दर्शीत केल्याप्रमाणें संगम बेटावरील जळालेल्या कागदपत्रांत हा करार भस्मसात् झाला कीं काय हें कळत नाहीं. असो.

## तह व करारमदार

'तह व करारमदार' ह्या ग्रंथांत इ. १७३६ ते १७८५ पर्यंतचे जंजिरेकर व पेशवे यांमधील ६ तह आलेले आहेत. सवाई माधवराव रो. भा. १ मध्यें १७९१ जून २० चें एक पत्र आलें आहे त्यांत बाळूमियाचें भाऊ व कांहीं मंडळी रायगडावर अटकेंत ठेविली होती ती सोडून देण्याबाबाचा मजकूर आहे. हा तह १७९१ जून ६ चा आहे. तह झाल्यानंतर ही मंडळी बंधमुक्त करण्याबद्दल लिहिलें हें युक्तच दिसतें. वरील मोबदल्याचा तह ज्या तारखेस झाला त्याच तारखेचा निर्देश करून ह्या तहांतील हा भाग प्रसिद्ध केला आहे. (जंजिरा इतिहास पृ. ११४–११५) पण प्रत्यक्ष तह पूर्ण रूपांत मिळाला पाहिजे.

## रामचंद्र आपाजी साठे

यादींत आलेले साठे हे आपाजी महादेव साठे यांचे पुत्र. आपाजीस आनंदराव भिकाजी रास्ते ह्यांनीं आपली कन्या–ही मुकी होती–दिली व तिचा पुत्र हा रामचंद्र-बाबा. हे रामचंद्रबाबा खर्ड्याच्या स्वारीवर गेले होते व त्यामुळें त्यास ३ ह. ची तैनात मिळाली होती व पुढें २३५० (रु. २००० जातीस व ३५० कारकून यास) रु. इ. १७९९ पासून दुसरे बाजीराव यांनीं अधिक तैनात दिली. ह्या दोहींचे उल्लेख ह्या यादींत आहेत.

---

ले. ६८ } श्री {

यादी

१ सुरतचे एजंट अरबरनटसाहेब याजकडून ता. १३ व १७ माहे मे सन इसवीचे पत्र आले कीं सिद्दी अबदुल करीम याकूबखान बहादर सचीनचा नबाब याच सिका पुणें दप्तरी मिळाल्यास पाठवावा. सुरतेजवळ सचीनचे नबाबाचा मुलूख आहे. तो पेशव्यांनीं दिल्हा त्याणी पेशवे ह्यास जंजिरा दिला. हे मोबदल्याची गोष्ट पन्नास वर्षे झाली, त्यावेळची दप्तरीं पाहिली असतां सिका मिळेल असें वाटतें.

कंपणी व माधवराव नारायणराव पेशवे यामध्यें मालिट साहेबांचे विद्यमाने ठराव जाहला. ता. ६ जून सन १७९१ इसवी. त्या ठरावापैकीं लिहितात कीं सिद्धी अबदुल करीमखा ऊर्फ बाळूमिया या ठरावांत लिहितात कीं सिद्धीने पेशव्यास कांहीं करारनामा दिला आहे, त्या सालापासून पाहिले असतां जलदी मिळेल. सिद्धी अबदुल करीम याणी मालिटसाहेब याजपाशीं करार केला कीं पेशव्यास कबूल केल्याप्रमाणें आम्ही चालवूं आणि त्या करारास तारीख १५ माहे साबान सन १२०५ हिजरी. हे कागद संगम बेटावर जळाले असतील असें वाटतें.

२ रामचंद्र आपाजी साठे यास माधवराव नारायणराव यांनीं तीन हजारांची जहागीर दिल्ही. बाजीरावसाहेब याणी तेविशीं पन्नास रुपयाची दिल्ही. अलफिन्स्टन साहेब याणी बंदोबस्त केला.

सदरहू दोन्ही कलमाबाबत दप्तरी दाखला पाहून लौकर पाठवावा. ता. ५ जून १८४४.

---

# ३९ रमाबाई पेशवे यांनीं सती जातांना दिलेले इनाम

( प्रो. द. वा. पोतदार )

ले. ६९ } {

*राजश्री देशाधिकारी × लेखक वर्तमान व भावी ताा जालगांव सुभा दाभोल ताो सुवर्णदुर्ग गो यांसि

दं अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य [मो. जा.*] श्री माधवराव नारायण प्रधान आसीर्वाद व नमस्कार सुाा इसने समानीन मयां व अलफ शके १७०३ प्लव नाम संवत्सरे विसाजी राम व त्रिंबक कृष्ण व आपाजी गोविंद उपनाम बरवे गोत्र कौसीक सूत्र आश्वलायन देशकुलकर्णी व खेरीज मौज टालसुरें करून गांवकुलकर्णी ताा मजकूर यांणी हुजूर कीं पुणें येथील मुकामी येऊन विनंती केली कीं आपण बहुत दिवस स्वामीसेवा येकनिष्टपणें केली कुटुंबवत्छळ आहों यास्तव श्रीमंत कैलासवासी सौ मातुश्री रमाबाई यांणी सती जाते समई आपणांस कुटुंबाचे योगक्षेमार्थ येक गांव नूतन इनाम द्यावयाविसीं सांगितले आहे त्याप्रमाणें स्वामींनी कृपाळू होऊन तालुके

---

* पा. स. १८।६६

सुवर्णदुर्गपैकीं गांव नूतन इनाम करार करून देऊन चालविले पाहिजे म्हणोन त्याजवरून मनास आणिता यांणी बहुत दिवस स्वामिसेवा येकनिष्टपणें केली कुटुंब-वत्छळ आहेत यास्तव तीर्थस्वरूप कैलासवासी सौ मातुश्री रमाबाई यांणी सती जाते समई यांस येक गांव नूतन इनाम द्यावयाविसीं सांगितले होतें त्याप्रमाणें यांचें चालवणें आवश्यक जाणोन याजवर रुपाळू होऊन यांस कुटुंबाचे योगक्षेमार्थ मौजे पांगारी ता॥ मजकूर हा गांव खेरीज सरदेशमुखी करून दरोबस्त देखील हयसीपटी कुल बाब कुल कानू हाली पटी व पेस्तर पेटी जलतरुतृणकाष्टपाषाणनिधिनिक्षेपसहित खेरीज हकदार व कदीम इनामदार करून इनामतिजाई सुधां सरकारातून नूतन इनाम करार करून दिल्हा असे तरी मौजे मजकूर सदरहूप्रमाणें याचे दुमाला करून देऊन यांस व यांचे पुत्रपौत्रादि वोंशपरंपरेने इनाम चालवणें दरसाल नवीन पत्राचा अक्षेप न करणें या पत्राची प्रती लेहून घेऊन हें असल पत्र यांजवल भोगवटियास परतोन देणें जाणिजे * छ २१ जिल्हेज ++ आज्ञा प्रमाण

लेखन
सीमा

पाठीवर
घाटोळा उलस्या नचा
शिका

० श्री
राजा शाहू नर
पती हर्ष नीधा
न माधवराव ना
रायण मुख्य
प्रधान

लेखन सीमेची एक जोडगिरी
चार

सदरील कागद मूळ रा. अनंत नीलकंठ बर्वे इनामदार राहणार जालगांव ता. दापोली जि. रत्नागिरी यांनी मूळ दाखविला तो वाचून रुजू पाहून वरील नकल असल बरहुकूम केली

---

## ४० नाना फडणविसाकडील भेटचिठ्या

( श्री. शं. ना. वत्स, जोशी )

श्री

*सेवेसी जनार्दन विठल सां नमस्कार विज्ञापना अंजणवेल वगैरे जमाबंदी प्रकरणी

* पा. स. १२।६५

विनंती करावयाची आहे व आणखीही जाबसाल पुसावयाचे आहेत गाठ पडली पाहिजे म्हणोन विनंती केलीच आहे आज्ञा जाहाली पाहिजे विज्ञापना

२

श्री

सेवेसी जनार्दन विठल सा। समस्कार विज्ञापना विनंती करावयाची आहे आज्ञा जाहाली पाहिजे हे विज्ञापना

३

सेवेसी जनार्दन विठल सा। नमस्कार सुवर्णदुर्गचा मजकूर आणखी कामाची विनती करावयाची आहे आज्ञा जाहाली पाहिजे हे विज्ञापना

४

से० ज० वि० वि० विनंती करावयाची आहे आज्ञा जाली पाहिजे हे विज्ञापना

५

से० ज० वि० सा। न० विज्ञापना ऐसी जे विनती करावयाची आहे आज्ञा जाहाली पाहिजे श्रुत होये हे विज्ञाप्ति

६

से० ज० वि० सा। नम० विज्ञापना अनागोंदी कराविसी स्मरणार्थ विनंती

वरील ६ चिठ्या पारसनीस संग्रहांत रुमाल ७९ फाइल नं. ४ मध्यें मिळाल्या. ह्या सामान्यतः चार बोटें रुंद व टचिभर लांबीच्या आहेत.

---

# ४१ नाना 'गदरी' व चिमणाराम थत्ते

( श्री. का. न. केळकर )

नानासाहेब पेशवे बंडांत कां सामील झाले याबद्दल एक कारण आजपर्यंत अप्रसिद्ध आहे. १८५७ सालच्या बंडापूर्वीं ५।६ महिन्यांतच इंग्रज सरकारनें चिमणराव थत्ते या पेशवे घराण्यांतील अज्ञान मुलाला हाताशीं धरून त्याचे वतीनें नानासाहेब पेशव्यावर मिळकतीच्या वांटणीकरितां एक दिवाणी दावा लावला होता. ह्या चिमणाराम त्यावेळीं सारा सतरा वर्षांचा असून बाजीरावाचे बंधू चिमाजी अप्पा पेशवे यांच्या मुलीचा मुलगा अर्थात् नानासाहेबांचा तो भाचा ठरतो. १८५४ सालीं बाजीरावाचें सर्व पेन्शन कंपनी सरकारनें बुडविलें व आतां कारण नसतां या

अज्ञान मुलाच्या निमित्तानें स्वतः कंपनी सरकारनें पक्षकार होऊन मिळकतीच्या अर्ध्या वाटणीचा दावा आणला. त्यांत पेशवे घराण्यांतील सर्व स्त्री नातेवाईकांना समन्सें काढलीं होती. या अमर्यादेमुळें व कुटिल नीतीमुळें नानासाहेब इंग्रजांवर अत्यंत चिडला आणि अतिमैत्रीचें दुसरें टोंक जें अतिशत्रुत्व तें त्यांनीं सहजच पत्करलें! या दिवाणी दाव्याचे कोणतेहि कागद सरकारनें प्रसिद्ध केले नाहींत. सोबतच्या दोन पत्रांत (शके १७६० च्या) चिमणारामाच्या जन्माचा उल्लेख असून, हत्तीवरून साखर वाटली नांव चिमणाराम असें ठेवलें व शके १७७८ चे पत्रांत चिमणाप्पा कोणाचेंहि ऐकत नाहीं, पैशाचीहि व्यवस्था नीट नाहीं अशी खासगीवाले यांची तक्रार आहे. या मुलाच्या अप्रबुद्ध बालबुद्धीचा उपयोग कंपनी सरकारनें नाना साहेबांना बुडविण्याचें हेतूनें केला असें दिसतें. चिमणारामसंबंधीं दाव्याचे कागद-पत्र उपलब्ध नाहींत. तथापि बंडाचे सुमारास तो 'अज्ञान' होता हें पुढील तीन पत्रांवरून सिद्ध होतें.

(१) सदर पत्र चित्रकूटहून गणेशशास्त्री साठे यांनीं राघोपंत दादा यांस लिहिलेलें आहे. त्यांत शके १७६० कार्तिक शु. १४ पर्यंत सुखरूप असल्याचें कळवून "श्री. सौ. बयासाहेब अश्विन वद्य ३ मंदवारी अवशचि १ घटका सुमारास प्रसूत होऊन पुत्र झाला नांव चिमणराव ठेवलें." असा मजकूर आहे.

(२) क्र. २ चें पत्र राधाबाईनें राजश्री दादा यास लिहिले आहे (शके १७६० चें). त्यांतहि श्री. सौ. द्वारकाबाईसाहेब अश्विन व॥ ३ मंदवारी प्रसूत होऊन मुलगा झाल्याचें कळविलें असून हत्तीवरून साखर वाटल्याचा उल्लेख आहे.

(३) फाल्गुन शु. १ शनिवार शके १७७६ चें पत्र महत्त्वाचें असल्यानें तें समग्र देतों. त्यांत चिमणराव कोणाचेंही ऐकत नाहीं, पैशाचीहि व्यवस्था ठीक नाहीं, असा खाजगीवाले यांचा अभिप्राय राधाबाईनें आनंदीबाई थत्ते हिस कळविला आहे.

---

} श्री {

(पत्र दाखल तारीख) फाल्गुन शु १ शनिवार शके १७७६ आनंदनाम संवत्सरे

ती. मातोश्री आनंदीबाई थत्ते वडिलांचे सेवेशीं अपत्यें राधा नमस्कार वि. ता छ २२ जमादिलावल (?) पावेतों वडिलांचें आशीर्वादेंकरून सुखरूप असो, विशेष. वडिलांकरितां मकरसंक्रमणाचें तीळ शर्करायुक्त पाठविले आहेत स्वीकार होऊन पावल्याचें लिहावें व काजूच्या बिया अर्धा शेर पाठविले आहेत येऊन पावतील आपण केली ——— दहा पाठविली ती पावली

ब्रह्मावर्ताहून निळकंठराव खाजगीवाले आले, त्यांनीं इकडे पत्र पाठविले त्यांत

मजकूर चिरंजीव रा. चिमणारामबाचा हे मामीचेहि ऐकत नाहींत व आमचे कांहीं ऐकत नाहींत व पैशाची व्यवस्था नीट दिसत नाहीं त्यास बंदोबस्त करविणें असल्यास पत्र पाठवून बंदोबस्त करावा असें खासगीवाले यांनीं लिहिलेला अभिप्राय वडिलांस लिहिला कळावें सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना ——— हेंच पत्रीं बयाक्काच नमस्कार रघुनाथ याचे सा. नमस्कार रमाबाई व रंगूबाई यांचे नमस्कार गणपत वासुदव लागू व लक्ष्मण चिंतो ——— यांचे नमस्कार ———

चिमणारामसंबंधी पुष्कळ माहिती उजेडांत यावयास पाहिजे.

———

## ऐ. संकीर्ण साहित्य खंड ६

# व्यक्ति-स्थल-सूची

# शिवचरित्र साहित्य खंड

| | | | | | किं. रु. |
|---|---|---|---|---|---|
| खंड १ | स्वी. ग्रं मा. क्र. | ३० | पुरंदरे व द. वि. आपटे | पृ. १५४ (श. १८४८) | १॥ |
| २ | ,, ,, | ३३ | मंडळाचिटणीस | पृ. ४२६ (श. १८५१) | ४ |
| ३ | पुरस्कृत ग्रं. मा. क्र. | २४ | शं. ना. जोशी व ग. ह. खरे | पृ. २७८ (श. १८५२) | ३ |
| ४ | स्वीय ग्रं. मा. क्र. | ३८ | मंडळचिटणीस | पृ. १२६ (श. १८५६) | १॥ |
| ५ | ,, ,, | ५५ | शं. ना. जोशी | पृ. ३६३ (श. १८६४) | ३॥ |
| ६ | ,, ,, | ४७ | ग. ह. खरे | पृ. १५० (श. १८५९) | १॥ |
| ७ | ,, ,, | ५० | रु. वा. पुरंदरे व ब. द. आपटे | पृ. १६४ (श. १८६०) | १॥ |
| ८ | ,, ,, | ५५ | शं. ना. जोशी | पृ. १३२ (श. १८६४) | १॥ |
| ९ | ,, ,, | ६२ | शां. वि. अवळसकर | पृ. ११८ (श. १८६६) | १। |

---

# ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड

| | | | | | किं. रु. |
|---|---|---|---|---|---|
| खंड १ | स्वीय ग्रं. क्र. | ३५ | मंडळ चिटणीस | पृ. २०२ (श. १८५३) | २ |
| २ | ,, क्र. | ४२ | मंडळ चिटणीस | पृ. १०० (श. १८५६) | १॥ |
| ३ | ,, क्र. | ५४ | शं. ना. जोशी | पृ. ३३२ (श. १८६३) | ३ |
| ४ | ,, क्र. | ५६ | मंडळ चिटणीस | पृ. १८६ (श. १८६४) | १॥ |
| ५ | ,, क्र. | ६१ | मंडळ चिटणीस | पृ. ९५ (श. १८६५) | १॥ |
| ६ | ,, क्र. | ६४ | शं. ना. जोशी | पृ. १०६ (श. १८६७) | २ |

---

# भारत–इतिहास–संशोधक–मंडळ–स्वीय–ग्रंथमाला

* हा ग्रंथ मुंबई सरकाराच्या प्राथमिक व दुय्यम शाळांच्या पुस्तकालयासाठीं मंजूर. ‡ हा शैक्षणिक ( training ) संस्था व शिक्षकग्रंथालयें यांसाठीं मंजूर.

१ अहवाल ( शके १८३२ ) ३
२ „ ( शके १८३३ ) ५
३ सुवंत विचार(कै.वि.का.राजवाडे)१०
४ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३४ ) ५
५ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १२ (कै.वि.का.राजवाडे)१।८
*६ प्रथम संमेलन वृत्त(शके १८३५)०१२
*७ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३५ ) ६
*८ द्वितीय संमेलन वृत्त ( शके १८३६ )३
*९ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३६ ) ३
*१० मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २० ( शिवकालीन घराणीं ) ३
*११ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३७ ) ६
*१२ तृतीय संमेलन-वृत्त(शके १८३७)३
*१३ मुकुंद–महाभाष्य ( संस्कृत ) ०८
*१४ ग्रंथराज ( दासोपंत ) ०८
*१५ स्फुट प्रकरणें भाग १ ला ०१२
*१६ स्फुट प्रकरणें भाग २ रा ०१२
***मंडळ–त्रैमासिक** प्रत्येक पुस्तक ३
*१७ वार्षिक इतिवृत्त( शके १८३८ ) ३
१८ चतुर्थ-संमेलन-वृत्त(शके१८३८)३
*१९ राजवाडे-खंड-स्थलसूची ४
*२० पंचम संमेलन-वृत्त (शके १८३९)३
२२ चंद्रचूड–दप्तर–कला १ ३
२३ महाराष्ट्र–सारस्वत (संपलें) १०
२४ षष्ठ संमेलन-वृत्त ( १८४० ) ४
२५ सप्तम संमेलन-वृत्त ( १८४१ ) ३
२६ संशोधकाची छोटी जंत्री ०४
२७ प्रदर्शन परिचय ०४
*२८ फारसी पत्रव्यवहार ५
२९ फार्सी–मराठी कोश ४
३० शिवचरित्रसाहित्य खंड १ ला १०८
३१ Historical Miscellany १
३२ पुरंदरे-दप्तर भाग१ ४
३३ शिवचरित्रसाहित्य खं. २ रा ४
३४ दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें खंड १ ला २
३५ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खं.१,२
३६ राजाराम–चरितम् १०८
३७ मंडळांतील नाणीं १
†३८ शिवचरित्रसाहित्य खंड ४ १०८
३९ गोवळकोंड्याची कुत्बशाही रु. ४
†४० ऐतिहासिक फारसी साहित्य रु.१०८
†४१ दक्षिणच्या मध्ययुगीन इ.सा.खं. २
†४२ ऐतिहासिक संकीर्ण सा.खंड२ १०८
४३ मंडळ चित्र ग्रंथ चित्रें २० ०८
४४ शिवकालीन पत्रसारसंग्रह खं.३ २॥
‡४५ विजयनगर स्मारकग्रंथ ४
†४६ ऐतिहासिक फारसी सा.खंड२ १०८
४७ शिवचरित्रसाहित्य खं. ६ १०८
†४८ मराठ्यांच्या सत्तेचा उत्तरेकडील विस्तार ०१२
४९ शिवचरित्रवृत्तसंग्रह कानडी १
५० शिवचरित्रसाहित्य खंड ७ १०८
†५१ ऐतिहासिक फार्सी साहित्य३ १०८
५२⎫ शिवचरित्रवृत्तसंग्रह २ व ३
†५३⎭ खंड: फार्सी विभाग प्रत्येकी १०४
५४ पुणें नगर संशोधन–वृत्त खंड १
५५ शिवचरित्रसाहित्य खंड ८ १०८
५६ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ४ २
५७ ऐ.संकीर्ण वाङ्मय साहि.खं.१ किं.१०८
५८ शिवकालीन दंडनीति–किं. ३
५९ पुणें नगरसंशोधन वृत्त खं.२ किं.१०८
६० ऐ. संकीर्ण निबंध खंड १ किं. १०८
६१ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ५ १०८
६२ शिवचारित्र साहित्य खंड ९ १०८
६३ हिंगणे दफ्तर १ ला खंड ३
६४ ऐ. सं. सा. खं. ६ १०८

**टीप**–ट. ह. व बंगी, व्ही. पी. वगैरे खर्च निराळा पडेल. † हा ग्रंथ त्रैमासिकांत भागशः प्रसिद्ध झाला आहे. ४०–४२,४६,४८,५१, ५३ स्वतंत्रहि मिळतात

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-पुरस्कृत-ग्रंथमाला

(१) मठगांवचा शिलालेख (पृ. २४३-कै. रां. ब. चांबेंडकर. रु. २ व रु. १०१४)
(२) पर्णालपर्वतग्रहणाख्यानम् (पृ. ५०-कै. स. म. दिवेकर. रु. ०१० व ०८)
(३) श्री शिवभारत (मूळ व मराठी भाषांतर-पृ. ५८९ मूल्य रु. ६ व ५०१२)
(४) शिवचरित्रप्रदीप (पृ.३२५-कागदी व कापडी. रु.३॥ व ४ आणि रु.३।व३॥)
(५) हिंदी शिल्पशास्त्र भाग १ ला. (पृ. २००-कै.रा. सा. रु.वि.वझे रु.३ व रु.२)
(६) शिवकालीन जंत्री शके १५५१-१६५० (पृ. २००-कै. ग. स. खरे रु. ५)
(७) साधन-चिकित्सा (पृ. ३२०-वा. सि. बेन्द्रे. रु. ३॥ व रु ३)
(८) ऐतिहासिक पोवाडे (पृ. ६१५-य. न. केळकर. रु.३ व रु. २॥)
(९) वाठारकर निंबाळकर-इतिहास (पृ. ३०० रु. १॥ व १०३०३)
(१०) भूतेश-आख्यान (०१२ व ०१०) (११) कऱ्हाड, (श्री. य. रा. गुप्ते, बी.ए.०८)
(१२) ऐतिहासिक प्रस्तावना (पृ: ६००-कै. वि. का. राजवाडे रु.३ व २०६ ०६)
(१३) राजवाडे यांचे संकीर्ण निबंध (पृ. २९१ श्री.शं. ना. जोशी रु. २ रु.१॥)
(१४) राजवाडे संकीर्ण निबंध भाग ३ रा. (पृ.२८० श्री. शं. ना.जोशी २व१०१४)
(१७) पुरंदरे-दप्तर, भाग २ रा. उत्तर पेशवाईतील पत्रव्यवहार (रु. ३ व रु. २॥)
(१८) The Escape of Shivaji from Agra (रावसाो देशपांडे-रु.३ व २॥)
(१९) लोककथा, पुस्तक १ लें (शं. ग. दाते कापडी, कागदी रु.१॥ व रु.१, १। व ०१४)
(२०) पानसे घराण्याचा इतिहास (कै. रा. ब. पानसे रु. ३ व रु. २॥)
(२१) कै. वासुदेवशास्त्री खरे-चरित्र (श्री. दा. मो. भट रु. २॥ व रु.२।-)
(२२) लोककथा भाग २ रा. (पृ.८०-श्री. शं.ग. दाते रु.१०८ व १०४ व १०४ व ०१४)
(२३) संपूर्ण भूषण (पृ. २३०-श्री. रा. गो. काटे-रु. १०८ व १०४)
(२४) शिवचरित्रसाहित्य खंड ३ रा (शं.ना.जोशी व ग.ह.खरे पृ.२८२-रु.३ व रु.२०८)
(२५) राजधानी रायगड (पृ. १६४-श्री. वि. वा. जोशी रु. १ व ०१२)
(२६) Shivaji (pp. 410-C. V. Vaidya Rs. 3 and Rs. 2-8-0)
(२७) आळंदी (पृ. २०-श्री. ग. ह. खरे ०२)
(२८) मठगांवचा शिलालेख : कुडाळप्रांतेतिहास (पृ.१६५ वालावलकर रु. १०२ व ०१२)
(२९) पुरंदरे दप्तर भाग ३ रा (पृ. २५०-श्री. कृ. वा. पुरंदरे ३ रु. व रु. २०८)
(३०) मध्वमुनीश्वराची कविता (पृ. २५८-श्री. कै. प्र. व्यं. गुच्ची ३ व २०८)
(३१) मराठ्यांच्या उत्तरेकडील मोहिमा (पृ. ९०-श्री. वि. गो. दिघे रु. १ व ०१२)
(३२) वेदस्तुति आणि स्फुट कविता (कृष्णदयार्णवकृत)-(किं.०१२ व ०१०)
(३३) ज्ञानप्रदीप (पृ. १२५-प्रो. द. वा. पोतदार रु. १ व ०१२).
(३४) पेशवाईच्या सावलींत (पृ. ४००-श्री. ना. गो. चापेकर किं. रु.४ व ३.)
(३५) मूर्तिविज्ञान (श्री. ग. ह. खरे-पृ. २५०,९४ चित्रें; मूल्य रु. ३०८ व ३).
(३६) आठल्ये घराण्याचा इतिहास-वि. वा. आठल्ये पृ. ४४० ३॥-३.
(३७) किल्ले पुरंदर कृ. वा. पुरंदरे किं. १ व ०१४
(३८) किल्ले विशाळगड पं. बा. शिरवळकर पृ. ९३ किं. १ व ०१२
(३९) श्रीशिवकाव्य (प्र.-ह. वा. भावे, शं. ना. जोशी पृ. २६६-रु. २॥ व २)
(४०) गुण्ये घराण्याचा इतिहास (वि. त्र्यं गुणे किं. रु. १०)
(४१, ४२) वैद्य दप्तर खंड १ व पुरवणी (शं. ल. वैद्य २॥ व ३ रु.)